






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष २० : अंक ४ दिवाळी २००२

अत्यंत विचाराचे बोल। तरी ते माईक फोल।
शब्द सबाह्य सखोल। अर्थचि अवघा॥
शब्दाकरिता कळे अर्थ। अर्थ पाहाता शब्द व्यर्थ।
शब्द सांगे ते यथार्थ। परी आपण मिथ्या॥
शब्दाकरिता वस्तु भासे। वस्तु पाहाता शब्द नासे।
शब्द फोल अर्थ असे। घनवटपणे॥
भुसाकरिता धान्य निपजे। धान्य घेऊन भूंस टाकिजे।
तैसें शब्दभूंस जाणिजे। अर्थ धान्य॥

अनुक्रमणिका






## अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
mparishad@yahoo.co.in
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा.
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

## संपादकीय

# सूनबाईचं भाषाशिक्षण

कोकणातल्या थेट आडगावी एका नातेवाईकांना भेटायला गेलो होतो. त्यांच्याकडे नुकतेच लग्नकार्य झालेले होते. चिक्कमंगळूरजवळच्या एका खेड्यातली मुलगी सून करून आणली होती. जेमतेम शिक्षण झालेल्या त्या नव्या नवरीला कन्नडशिवाय दुसरी कोणतीही भाषा येत नव्हती. खेड्यातल्या शेतकरी कुटुंबात वाढल्यामुळे की काय, तिला इंग्रजी-हिंदीचाही स्पर्श नव्हता. इकडे सासरी तर कुणालाही कन्नड भाषेतला एकही शब्द येत नव्हता. सगळे तिच्याशी शुद्ध मराठीत बोलत. तिला काही विचारायचे झाले, तर ती खाणाखुणा करून, वस्तूंकडे बोट दाखवून काम निभावून नेई. पण तिचे काहीच अडत नव्हते; कारण सासरची माणसे प्रेमळ होती आणि ती या कुटुंबात येऊन तशी खूष झालेली दिसत होती.

अजिबात मराठी न येणाऱ्या मुलीशी लग्न कसे काय केले, या माझ्या प्रश्नाला घरातल्या एका आजीबाईंनी उत्तर दिले, "काही नाही, आमच्या नात्यातले एक कुटुंब तिकडे कर्नाटकात गुजराण करते आहे. बरेच दिवस झाले. संबंध तुटत चालला होता. अशीच एका लग्नात ही मुलगी दिसली. आमच्या राबत्या घरात असलीच कामसू मुलगी हवी होती. मग दूरचं नातं जवळचं करायचं ठरलं अन् झालं लग्न महिन्यापूर्वी."

पण मला प्रश्न पडला होता की आता या मुलीचे कसे होणार? जन्मभर ही एखाद्या मुक्या मुलीसारखीच का खाणाखुणा करीत जगणार? स्वतःच्या जीवनातल्या हर्ष-खेदाच्या भावना कुणाकडे तरी, निदान पतीसारख्या जवळच्या माणसाकडे तरी व्यक्त कराव्या वाटल्या, तर ही काय करणार? असले विभाषी लग्न करून या सगळ्यांनी या मुलीचा मनुष्य म्हणून जगण्याचा आनंद हिरावून घेतला आहे, इथपर्यंतचे विचार त्या वेळी माझ्या मनात येऊन गेले.

दुसरेच दिवशी मी पुण्याला परतलो आणि माझे नेहमीचे जीवनचक्र सुरू झाले. मध्येच कधीतरी त्या गोड, हसऱ्या सूनबाईची आठवण येई आणि तेवढ्या वेळापुरता मी व्यथितही होई. पुढे दोनेक वर्षांनी मला पुन्हा त्या गावी जाण्याचा योग आला. मी त्या घराशी पोहोचलो, तर दारात खुद्द ती सूनच उभी होती. तिने

मला ओळखले. माझे तिने हसून स्वागत केले. "या हो या; तुम्हाला अचानक पाहून फार आनंद झाला बघा," असे स्वच्छ मराठीत म्हणाली. मग आतल्या खोलीकडे तोंड करून मोठ्या स्वरात म्हणाली, "मोठ्या आई, अहो मोठ्या आई! कोण आलंय ते पाहा. अहो, आपले पुण्याचे दत्ताकाका आलेत." तिने लगबगीने माझे सामान आत ठेवून मला पाणी आणून दिले आणि म्हणाली, "हातपाय धुवून जरा ताजेतवाने व्हा. तोपर्यंत मी चहा करते."

आल्यापासून मी आश्चर्यात खोलवर बुडून गेलो होतो. दोन वर्षांपूर्वी जिला मराठीतले ओ की ठो कळत नव्हते, ती ही मुलगी मराठी इतक्या सफाईने बोलत आहे, की जणू तिची मराठीच मातृभाषा आहे. हे कसे घडले असावे? कोणी शिक्षक वगैरे ठेवला असेल का हिला मराठी शिकवायला? मी केवळ विचार करीत राहिलो. दुपारी चहा झाल्यावर मी आरामखुर्ची टाकून अंगणात बसलो. ती जवळच काही निवडण करीत माझ्याशी बोलत बसली होती. ती एकूण स्वभावाने मोकळी अन् मनमिळावू मुलगी असल्याने आमच्या चांगल्या गप्पा चालल्या होत्या. याचाच फायदा घेऊन एका क्षणी मी तिला माझ्या मनात सकाळपासून खदखदणारा प्रश्न विचारला, "सूनबाई! तुला एक विचारतो. दोन वर्षांपूर्वी मी येथे आलो होतो. तूही या घरात नवी नवरी होतीस. तेव्हा तर तुला मराठी अजिबात येत नव्हतं. तुझं सगळं खाणाखुणांनी अन् हावभावांनी चालायचं. मग हे इतकं चागलं मराठी तुला कसं काय यायला लागलं? सांगशील का जरा?"

यावर तिने जे सांगितले, ते खूपच स्वारस्यपूर्ण आहे. तिच्या एकूण सांगण्याचा आशय असा की ती हळूहळू अनुभवातून म्हणजे अनुभव घेत घेत शिकली. उदाहरणार्थ, सासूबाई तिच्यापुढे वांगी आणून ठेवीत आणि म्हणत, "ही वांगी आहेत." हातात विळी देत आणि म्हणत, "ही विळी आहे." मग चिरण्याचे हावभाव करीत म्हणत, "तू मला वांगी चिरून दे." तिने वांगी चिरून दिली की म्हणत, "आता मी भाजी टाकते आहे, ती बघ. श्रीकांतला (तिच्या नवऱ्याला) जरा मसालेदारच लागते," इत्यादी. तिची सासूच तिची मराठीची शिक्षिका होती. अमराठी व्यक्तीला मराठी कसे शिकवायचे हा प्रश्न तिच्या सासूला अजिबात पडला नव्हता. साधे पाणी द्यायचे काम असले, तरी सासू ते तिला मुद्दाम सांगे. तिच्या हातात पाणी देताना म्हणे, "हे पेलाभर पाणी. तिकडे तुझे सासरे बसले आहेत; त्यांना नेऊन दे."

ती सूनबाई मला म्हणाली, "मलाही प्रत्येक गोष्ट समजून घेण्याची, त्या

वस्तूला, त्या कृतीला मराठीत काय म्हणतात, हे जाणून घेण्याची गोडी लागली. सुरुवातीला मी मोडकं-तोडकं मराठी बोले. त्याची गंमत होई. कधी घोटाळेही होत. पण चुका करीत करीतच मी शिकले बघा."

पुढे ती हसत हसत आणखी म्हणाली, "माझे बाबा म्हणायचे, चोरांच्या टोळीत सापडलेला माणूस चोर बनतो; साधूंच्या टोळीत सापडलेला माणूस साधू होतो. हेही तसंच आहे म्हणा की! मी मराठी बोलणाऱ्यांच्या टोळीत सापडले आणि मराठी बोलणारी बनले."

त्या दिवशी त्या हुशार सूनबाईने माझे खूपच प्रशिक्षण केले. तिचे बोलणे ऐकताना माझ्या लक्षात आले की एखादी भाषा खरेखुरेपणी जर शिकायची असेल, तर ती भाषा बोलणाऱ्या समाजाचा थेट अनुभव घ्यायला लागणेच जास्त रास्त. व्याकरण किंवा भाषेचा रूपात्म आकार शिकण्यापेक्षा भाषाशिक्षणाची ही 'मेथड' बरी आणि मुख्य म्हणजे खरी आहे. नाही तरी स्वभाषासुद्धा आपण अनुभव घेतघेतच शिकत असतो ना? आणि व्होर्पसाहेबांचा सिद्धान्त हेच सांगतो की, 'तुम्हाला एखादी भाषा किती येते, तर तुमचा जेवढा अनुभव असेल तेवढ्याच आकाराची.' तेव्हा भाषा शिकायची असेल तर थेट अनुभवालाच भिडायला हवे.

■

द. दि. पुंडे



अनुक्रमणिका

# भाषा आणि विनिमय : एक काव्यानुभव

नीलिमा गुंडी

भाषा आणि जीवन यांच्या संबंधाविषयी सूचक भाष्य करणारी एक कविता वाचनात आली. द. भा. धामणस्करांच्या 'बरेच काही उगवून आलेले ...' या संग्रहातील "दोन दरांच्या टोमॅटोज्पासून" ही ती कविता होय. ती कविता अशी -

## दोन दरांच्या टोमॅटोज्पासून

तिच्याजवळ दोन प्रकारचे टोमॅटोज् :
बाराआणेवाले आणि एक रुपयावाले.
गिऱ्हाइकाने चांगले बाराला मागितले तर ते
भाजी विकणारं मराठी बाईमाणूस हसत
इंग्रजीत म्हणतं, "नो, नो ...
धिस इज वन रुपी ...."
तिच्या इंग्रजीनं कस्टमरचं छान मनोरंजन.
तो मुद्दाम कोऱ्या नवीन नोटा देतो तेव्हा ती
खुषीत एक टोमॅटो वर देते. म्हणते,
"नो मनी .... फ्री ..." मग
पुढं निघणारं गिऱ्हाईक (आणखी इंग्रजी ऐकण्यासाठी)
चिथावणी दिल्यासारखं उद्गारतं, "बाई,
तुमचा मुलगा नक्कीच
इंग्लिश मिडिअमला असणार!"
तर बाई डोळ्यांतील अनावर कढ आवरत
इंग्रजीतून शिकणारा मुलगा
हल्लीच गेल्याची अपघाती घटना
मायबोलीत सांगू लागतात :
बाजार उठेपर्यंत गिऱ्हाईक
आईचं, मुलाचं चरित्र ऐकत राहतं ...



अनुक्रमणिका

दोन दरांच्या किरकोळ टोमॅटोज्‌पासून
सारं सुरू झालेलं ..."

('बरेच काही उगवून आलेले ....' द.भा. धामणस्कर मौज प्रकाशन, मुंबई, २००१ पृ. ४८)

धामणस्कर हे एक तरल आणि डोळस काव्यदृष्टी असलेले कवी आहेत. आजूबाजूला वेढणारे बदलते महानगरीय पर्यावरण त्यांना जाणवते. या कवितेत त्यांनी बाजारात भाजी विकणाऱ्या एक व्यक्तीचे चित्रण सहृदयतेने केले आहे. विक्रेत्याचे जगणे टिपताना 'विनिमयाची भाषा' हे आपोआपच अनुभवाचे केंद्र बनले आहे. ही विनिमयाची भाषा आणि त्या भाषेतून घडणारा व्यवहार कवीने डोळसपणे पाहिलाही आहे. तो व्यवहार विनिमयाच्या भाषेसकट शब्दांकित झाल्यामुळे त्यातून एक अनुभव तरल, काव्यात्म रूपात साकारला आहे.

येथील विक्रेता ही एक स्त्री आहे - एक अशिक्षित स्त्री आहे. मात्र तिच्या तोंडून विक्रेता या रूपात अपेक्षित अशी मालाच्या भलावणीची 'गावरान' भाषा ती वापरत नाही. 'आजच्या' बाजारातील ग्राहकांचे मानसशास्त्र हेरून तिने स्वतःची एक खास अशी बोलण्याची शैली घडवली आहे. ठरावीक इंग्रजी शब्दांचा जुजबी वापर करण्याचे तंत्र तिने आत्मसात केले आहे. 'भाजी विकणारं मराठी बाईमाणूस' ही तिची मूळ ओळख आणि तिच्या तोंडची भाषा यात असे अंतर पडले आहे. तिच्याजवळ असलेल्या दोन दरांच्या टोमॅटोंची विक्री करताना, ती दरांच्या काटेकोरपणाबाबत आग्रही आहे. 'नो, नो, धिस इज वन रुपी' अशा शब्दांत ती तो आग्रह नोंदवते. 'कस्टमर'शी बोलतानाचे तिचे भाषिक धोरण हे तिच्या व्यवहारीपणाचाच एक भाग आहे. गिऱ्हाईकांचे मनोरंजन करणे, त्याला आकर्षित करणे - हे या भाषेचे प्रयोजन आहे. या व्यवहारात अशी भाषा जेव्हा गिऱ्हाईक आणि विक्रेता यांना जवळ आणते, तेव्हा त्यांच्यात एक खुषीच्या सौद्याने हलकेसे जवळिकेचे नाते निर्माण होते. गिऱ्हाईक तिला 'नव्या कोऱ्या' नोटा देतो आणि तीही त्याला एक टोमॅटो 'फ्री' देते. हे नाते जरी जवळिक प्रस्थापित करणारे असले, तरी त्याचा पोत 'व्यावहारिक'च आहे. 'नो मनी', 'फ्री' या तिच्या शब्दांनी नकळत व्यवहाराची जाणीव करून दिलीच आहे. पैसा न घेता एखादी वस्तू देणे, हा दूरदृष्टीने केलेला व्यवहारही असू शकतो! गिऱ्हाईकाला आपल्याकडे आकर्षित करण्याचे ते तंत्रही असू शकते. खरेदी करून झाल्यानंतर गिऱ्हाईक तिला आणखी इंग्रजी बोलायला उद्युक्तही करते.

ते गिऱ्हाईक तिला म्हणते, ‘बाई, तुमचा मुलगा नक्कीच इंग्लिश मिडियमला असणार!’ अलीकडच्या काळातील एक सामाजिक बदल या शब्दांमधून लक्षात येतो. आपल्या समाजात आजवर तळागाळाशी राहिलेल्या समाजघटकांनी स्वतःच्या विकासाची दिशा म्हणून इंग्रजी भाषेचा अंगीकार करायला सुरुवात केली आहे. त्यामुळे इंग्रजी माध्यमातील शिक्षण आर्थिकदृष्ट्या परवडणारे आहे की नाही, याचाही प्रसंगी विचार न करता अनेकजण आपल्या मुलांना ते शिक्षण देत आहेत. ती भाजी विकणारी स्त्रीदेखील या लोकांची प्रतिनिधी आहे. तेव्हा गिऱ्हाईकाचा तर्क बरोबरच आहे!

पुढे, गिऱ्हाईक आणि विक्रेती यांच्यातील व्यवहाराला एकदम कलाटणी मिळते. गिऱ्हाईकाने मुलाच्या शिक्षणाविषयी विचारताच भाजीवालीच्या मनातील जखमेवरची खपली निघते आणि मग भळभळ वाहू लागणारे शब्द मायबोलीतील असतात. भाजीवालीचा इंग्रजीतून शिकणारा मुलगा अपघातात गेलेला असल्यामुळे तिच्या मनात ते दुःख गदगदत आहे. अशा वेळी ती जी भाषा वापरते, ती भाषा अर्थातच ‘मायबोली’ आहे. कारण ती भाषा तिच्या आंतरिक विश्वाची - भावना, जाणिवा आणि स्मृती यांची - भाषा आहे. एकदम खटकन प्रवाह बदलावा तसा आता आर्थिक विनिमयाचा व्यवहार थांबतो आणि भावनिक संवादाचा झरा प्रकटतो. हा झरा त्या दोघांनाही बाजाराच्या पायावर उभ्या असलेल्या नातेसंबंधांचा कसा विसर पाडतो, ते पाहण्याजोगे आहे.

कवी म्हणतो “ बाजार उठेपर्यंत गिऱ्हाईक<br>आईचं, मुलाचं चरित्र ऐकत राहतं ....”

बाजाराच्या नेहमीच्या घाईगर्दीच्या आणि रोकडया व्यवहाराच्या संदर्भात गिऱ्हाईकाचे हे ‘ऐकत राहणे’ वेगळेपणाने उठून दिसते. तेथे त्या दोघांमध्ये मानवी सहानुभवाचे नाते निर्माण झाले आहे आणि ते नाते मायबोलीच्या धाग्याने निर्माण केलेले आहे.

या कवितेत ‘कुशल विक्रेती’ या रूपातील भाजीवालीचा व्यवहारीपणा सुरुवातीला लक्षात येतो. त्याआड लपलेले दुःखानुभवाने पोळून निघालेले आईचे मन मात्र शेवटी व्यक्त होते. विशेष म्हणजे कवी तिच्या तोंडून तिच्या दुःखाचे कसलेच वर्णन करायला तिला भाग पाडत नाही. भाषेच्या वापराइतकाच भाषेवरील संयम हाही कलात्मकदृष्ट्या गुणस्वरुप कसा ठरतो, ते येथे लक्षात येते.

विक्रेतीच्या जगण्याच्या जशा दोन पातळ्या आहेत, तशाच दोन पातळ्या

गिऱ्हाईकाच्या जगण्याच्याही आहेत. गिऱ्हाईक तिला बोलते करते, तेव्हा त्याचा हेतू काहीसा चेष्टेखोरपणाचाच आहे. खरेदी करताना आधी भाव कमी करण्याचा प्रयत्न करून बघणारी (एक रुपयावाले टोमॅटो बारा आण्याला मागणे) त्याची व्यावहारिक जगण्याची पातळी कवितेतून लक्षात येते. त्याचबरोबर संवेदनशीलता असलेले मन त्याच्या ठायी जिवंत आहे, याची ग्वाहीही शेवटी मिळते. 'गिऱ्हाईक' जेव्हा 'श्रोता' या भूमिकेत शिरते, तेव्हा ते कालनिरपेक्ष अशा मानवी मूल्यांचे प्रतिनिधित्व करते. आता विनिमयाच्या भाषेची जागा भावसंवादाने घेतलेली असते. किरकोळ विक्रीच्या व्यवहाराची जागा शाश्वत अशा मानवी नातेसंबंधाने घेतलेली असते. "दोन दरांच्या टोमॅटोज्‌पासून" ही कविता भाषा आणि जगणे यांच्या संबंधावर असे सूचक भाष्य करते. दोन दरांप्रमाणेच जगण्याच्या दोन पातळ्याही त्यातून उलगडत जातात. मुख्य म्हणजे दोन अपरिचितांमध्ये माणुसकीचे नाते निर्माण करण्याची ताकद असलेल्या मायबोलीचे महत्त्व किती 'अमोल' आहे, हे शेवटी अधोरेखित होते.

■

**३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे - ४११ ००२**

## परिषद वार्ता

१. मैसूर येथील 'भारतीय भाषासंस्थान' [Central Institute of Indian Languages. Ministry of Human Resource Development, Department of Secondary and Higher Eduation, Government of India] तर्फे 'भाषा आणि जीवन' या नियतकालिकासाठी यंदा दहा हजार रुपयांचे अनुदान देण्यात आले आहे.

२. मराठी अभ्यास परिषदेची सहावी वार्षिक सर्वसाधारण सभा दि. २८ जुलै २००२ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद (पहिला मजला), पुणे येथे सायंकाळी ६ वाजता घेण्यात आली.



अनुक्रमणिका






# मानवी विकास आणि भाषा : अंतःसंबंध

विश्वनाथ खैरे

मानवी विकास आणि भाषा यांचा अंतःसंबंध जोडलेल्या जुळ्यांसारखा आहे. एक दुसऱ्यावर अवलंबून राहत आले आहे; तसेच एक दुसऱ्याला मदत करीत आले आहे. आधुनिक भाषाविज्ञानाचे एक जनक सोस्यूर यांनी म्हटल्याप्रमाणे,

आपण कितीही मागे गेलो तरी भाषा ही त्याआधीच्या काळाचा वारसा असल्याचे दिसते. (पृ. ७१, कोर्स इन जनरल लिंग्विस्टिक्स्, १९६०) आपण त्यातल्या त्यात मानवजातीच्या उदयापर्यंत गेलो, तरी सोस्यूर यांच्या विधानाचा प्रत्यय येतो.

**१. मानवजातीचा विकास**

मानवजातीचा उदय अचानक झाला नसून पृथ्वीतलावरील निसर्गातल्या जीवविकासाच्या क्रमात झाला आहे, हे आपण जाणतोच. हा विकास होण्यात काळ खूपच गेला. आजच्या मानवजातीच्या दोनच पूर्वज जातींच्या जीवनात सत्तर लाख वर्षे गेली. अधिक प्राचीन 'वानरसमान मानव' चार हातापायांवर वावरत होता, त्याची साठ लाख; तर नंतरचा 'खडा मानव' दोन पायांवर वावरू लागला, त्याची दहा लाख वर्षे. या खड्या मानवातून विकसित झालेल्या 'विचारक मानवा'ला सुमारे तीन लाखच वर्षे झाली आहेत. या तिन्ही अवस्थांतल्या मानवाच्या मेंदूच्या आकारांची तुलना करता येते. वानरसमान मानवाचा मेंदू सुमारे ४५० ग्रॅम, खड्या मानवाचा ९४० ग्रॅम आणि विचारक मानवाचा १३५० ग्रॅम आढळतो. भाषेचे उगमस्थान मेंदूत असल्यामुळे विचारक मानवाची भाषा किती प्रमाणात गुणित गुणांची आहे, याचा अंदाज करता येईल.

मेंदूबरोबर इतर अवयवांच्या बाबत आणि जीवनयात्रेतही या तिघांच्यात फरक होते. वानरसमान मानवाची नजर तेवढी बारकाईची नव्हती. मुख्य म्हणजे त्याच्या हाताचा आंगठा बोटांच्या समोर येत नव्हता. त्यामुळे झाडांवर जगणाऱ्या या प्राण्याला फांद्यांना लोंबकळता आले, तरी दगड हातात घेता येत नव्हता. खड्या मानवात या उणीवा कमी झाल्या. खडा मानव गुहावासी होता. त्याला आगीचा उपयोग करता येत होता. त्याने दगडाची हत्यारे बनवली आणि तो शिकारी होता.

## २. बोल आणि भाष

शिकारीसाठी समुदायाने कृती करणे आवश्यक होते. त्यासाठी एकमेकांना झटपट सूचना द्याव्या लागत होत्या. सूचनांसाठी तोंडाने केलेल्या आवाजाचा उपयोग पक्षी-अवस्थेपासूनच्या जीवजाती करीत होत्या. पण पक्ष्यांचे ध्वनी ठरावीक आणि १२ ते २४ पर्यंत मर्यादित होते. चिपांझीसारख्या, माणसाला जवळ असलेल्या प्राण्यातसुद्धा सूचक आवाजांची क्षमता मर्यादितच असते. माणसाला अधिक सूचक ध्वनींची गरज होती. त्यासाठी त्याने बोली विकसित केली. त्या कामात स्वरयंत्र आणि मुखाची पोकळी यांचा संबंध महत्त्वाचा असला तरी, सोस्यूरनी म्हटल्याप्रमाणे, मुखी बोली नव्हे, तर भाषारचनेची क्षमता ही मानवजातीला निसर्गप्राप्त आहे. भाषा म्हणजे वेगवेगळ्या कल्पनांसाठी वेगवेगळी चिह्ने असलेली शिस्तिम (शिस्तशीर व्यवस्था). (उक्त पृ. १०)

अर्थात, बोलीची निर्मिती करणारा 'खडा मानव' भाषेची क्षमता असलेल्या मेंदूचा धनी होता.

सोस्यूर यांनी केलेला भाषा आणि बोली (langue, parole) यांचा भेद ज्ञानेश्वरीतल्या खास मऱ्हाटी शब्दांत आपल्याला व्यक्त करता येईल.

आपपरु हे भाष । जाणणें चि नाहीं । १३.३५५

पैं स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे सविशेष । १३.४९८

यांसारख्या आणि इतरही ठिकाणी 'भाष' हा संकल्पना-वाचक शब्द आहे. तो भाषा या शिस्तिमच्या आधारभूत चिह्नाचा वाचक धरता येईल. तसाच 'बोल' हा बोली या शिस्तिमचे आधारभूत चिह्न म्हणता येईल.

पैं बोलावेया नांव एक । करावें लागे । १३.८८२

यात बोलाचे चिह्नत्व आणि लौकिक कार्य सांगितले आहे. पण मेंदूतली संकल्पना आणि मुखातला बोल यांचा अंतःसंबंध

तेणें कारणे मी बोलैन । बोलीं अरूपाचें रूप दावीन । ६.३६

या चरणात नेमका आला आहे. भाष या अरूप चिह्नाचे ध्वनीतले रूप बोल दावीत असतो. भाष मेंदूतच आणि अमूर्त असते. बोल मुखावाटे व्यक्त होतो. प्रत्येक बोलता माणूस या मानवी अर्थाने आपल्या मेंदूतल्या अरूपाचे रूप समाजाला दावीत असतो.

## ३. मेंदूचा विकास

सोस्यूर यांनी या संकल्पना विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात मांडल्या. त्यानंतरच्या नऊ दशकांत मेंदू आणि बालविकास यांचे जे संशोधन झाले आहे,



अनुक्रमणिका

त्यातली काही माहिती या विषयाच्या चर्चेला उपकारक होईल.

मेंदू हा शरीरात असलेला जगातला महत्तम संगणक म्हणता येईल. त्याला शरीरातल्या इंद्रियांतून शंभर अब्ज चेताकोश माहिती पुरवीत असतात. त्या माहितीची छानबीन करून आज्ञा देण्याचे काम मोठ्या मेंदूमधले विविध टापू करीत असतात. वेर्निके टापू भाषेच्या बाबतीत विशेष महत्त्वाचा आहे, पण त्यात भाषेशिवाय इतरही अरूपांवर प्रक्रिया होत असते. ब्रोका टापू मुख्यतः बोली प्रकट करणारा आहे.

भाषेला आणि / किंवा गणितासारख्या अरूपांना वाहिलेला मेंदूचा भाग असा मोठा असला, तरी कुशल कामकरी हातांसाठीही मोठा टापू झटत असतो. शरीराच्या सामान्य हालचालींसाठी मेंदूतला थोडाच भाग राखलेला आहे. त्या हालचालींपैकी पुष्कळांचे नियमन पाठीच्या कण्यातच होते. अरूपाच्या प्रक्रिया आणि नवनिर्मितीला मार्गदर्शन करायला मेंदूला जास्त मोकळीक मिळावी म्हणून ही योजना असते.

या नवनिर्मितीत इतर मानवांचा सहभाग मिळवण्यात बोलीची मदत होते. विज्ञानाची घडण मेंदूतच होते आणि विज्ञानावर आधारित साधनांमुळे कामकरी हातपायांची हजारो पटींनी वाढवलेली क्षमता मेंदूच कामी लावतो. आता संगणकांनी मेंदूच्या घाणावटी कामातही मोलाचा वाटा उचलला आहे. मात्र काटेकोर गणितीपणाचा अभाव असलेल्या भाषा आणि बोली समजून घेण्याची शक्ती संगणकांना अजून प्राप्त झालेली नाही.

'या माझ्या हातांनी जगण्याला नीड दिले' या कविवचनात वस्तुमय संस्कृतीच्या स्वरूपातला मानवी विकास कामकरी हातांनी साधल्याचे भान आहे. त्याचबरोबर अरूप किंवा अमूर्त कल्पनांच्या अंगाने मनोमन विकासही होत आला आहे. मानवाची वस्तुमय आणि मनोमय संस्कृती उभी करण्यात भोवतालच्या विश्वातल्या निसर्गाचा वाटा आहे, तसाच मेंदवी शक्तीचा मोटा वाटा आहे. ही संस्कृतीच जीवविकासानंतरच्या मानवी विकासाची खूण आहे. दहा-बारा हजार वर्षांपूर्वीपर्यंत पूर्णपणे निसर्गाच्या सत्तेत किंवा छायेत वावरणारा मानव आता पुष्कळ अंशी स्वनिर्मित संस्कृतीत जगू पाहत आहे.

या संस्कृतीत भाषेची आणि बोलीचीही वाढ मोठी झाली आहे आणि होत राहावीही लागणार आहे. दरेक पुढच्या पिढीला आधीच्या पिढ्यांचे ज्ञान पुरवून भाषेने आणि बोलीने या संस्कृतिक मानवी विकासाला मोठा हातभार लावला आहे.

पुढची पिढी मेंदूनेच हे ज्ञान आत्मसात करते. जन्मापासून सुरू होणारी ही क्रिया म्हणजे बोलीने भाषेला दिलेले भरणपोषण असते.

### ४. मुलाचा भाषाविकास

जन्माला येणारे तान्हे मूल हातपाय हलवू शकत असले, तरी उभे राहू शकत नाही. ही काहीशी चार हातापायांवर चालणाऱ्या मानवाच्या पूर्वज जातीची स्थिती असते. तान्हुल्याचे स्वरयंत्र बरेच वर असल्यामुळे, त्याला चिपांझीसारखे आवाज काढता आले, तरी मुखातून बोल काढता येत नाहीत. मात्र त्याचे डोके शरीराच्या मानाने मोठे असते आणि त्यातल्या मेंदूत त्याच्या साऱ्या क्षमता विद्यमान असतात.

हा मेंदू अरूपाचे खेळ करू शकतो, ही महत्त्वाची गोष्ट आहे. गर्भात ऐकलेल्या आवाजांवरून त्याला आईचा आवाज जन्मतःच ओळखू येतो. एक महिन्याचे मूल तुमच्या चेहऱ्याच्या हावभावांची नक्कल करते.

भाषा या अरूपाचे बरेच ज्ञान बरोबर घेऊन मूल जन्माला येते. इतर माणसे आपल्याला माहीत नसलेल्या गोष्टींबद्दल बोलताहेत, हे त्याला माहीत असते. त्या बोलण्यांवरून ते प्रथम ध्वनी शिकते. तीन महिन्याची मुले ऊऊऊ करतात, सात महिन्याची 'बलबल' करतात, ब द म ग असे आवाज काढतात; कोणते ध्वनिबंध शक्य आहेत, ते कळवून घेतात.

याशिवाय मुलाला अवकाशाच्या त्रिमितीचे भान असते. त्याला वस्तूंच्या कडा ओळखू येतात. म्हणजे ते विभागणी किंवा वर्गवारी करू शकते. फक्त खांद्यावर, गुडघ्यावर व कमरेवर दिवे लावून काळोखात चालणारा अमूर्त आकार माणसाचा आहे, हे मुलाला कळते. एक वर्षाचे मूल वस्तूकडे बोट दाखवते किंवा दुसऱ्याने बोटाने दाखवलेल्या वस्तूकडे पाहते.

एका महिन्यापासून मूल कोणत्याही भाषेतले ध्वनी आत्मसात करते. सहाव्या महिन्यानंतर मात्र ते आईच्या बोलीतल्या ध्वनींचे मनोमन साचे बनवून, परभाषेतले शब्दही त्या साच्यांनुसार बोलते. पहिल्यापासून आई त्याच्याशी शब्द लांबवून, आळवून बोलते. त्यातल्या वाक्यातले शब्द सुटे करण्याची क्षमता त्याच्यात असते. दहा महिन्यांच्या वयाला परभाषांऐवजी मायबोलीची ध्वनिव्यवस्था त्याच्या मेंदूत पक्की होते.

एक वर्षाचे मूल आधी शब्दघटनेचे नियम समजून, मग शब्द आत्मसात करू लागते. बोलता आल्याबरोबर त्याचा नामकरणाचा धुडगूस सुरू होतो. या नामकरणात 'सारखण' आणि अर्थांतरांचाही अवलंब होत असतो. उदाहरणार्थ,

एका लहान मुलीने 'चांदुबा' या एकाच नावाने दिवे, संत्री (फोडींच्या आकारात कापलेली), नखे या सर्वांचा निर्देश केला. आपण बनवलेले शब्द आपल्या उपजत सरणीने वापरून मूल वाक्ये बनवते, आपल्या इच्छा व्यक्त करते; नंतर आपली वाटणी, समजुती सांगू लागते.

दीड वर्षापर्यंत 'मी हे भाष नेणें' अशी त्याची स्थिती असते. त्यानंतर स्वतःचा निर्देश 'मी' या नावाने होऊ लागतो. स्वभाषा समजणे म्हणजे एका प्रचंड चिह्नव्यवस्थेचा भेद करणे. हे काम तीन वर्षांचे मूल सहज करून टाकते, जे अद्याप कोणताही संगणक करू शकत नाही.

## ५. सारखण, अर्थांतर

लहान मुलाच्या या विकासातून मानवी भाषाविकासाच्या प्राचीन टप्प्यांची काहीशी कल्पना आपण करू शकतो. आजच्या नवजात अर्भकाचा मेंदू ही जीवविकासातली आजवरची सर्वात वरची पायरी आहे. लाखो वर्षांपूर्वीच्या मानवात ती पायरी गाठलेली नव्हती. त्यामुळे अरूप विचाराची क्षमता त्या प्रमाणात कमी होती. निसर्गक्रमाने होत गेलेली ती वाढ मंदगतीची होती.

मुलाच्या मेंदूच्या उपजत क्षमतांना बाहेरून बोलीचे भरण मिळणे, हे या विकासाला फार महत्त्वाचे आहे. हे भरण मुख्यतः आईकडून आणि पर्यायाने आईबापांच्या समाजाकडून मिळते. तीन वर्षे वयापर्यंत मायबोली मुलात रुजली, याचा अर्थ असा की आईची भाषा मुलाची भाषा झाली. विरळ वस्तीच्या प्राचीन काळात, (आणि आजच्याही निरक्षर समाजात) आजच्या अर्थाने 'अडाणी' असलेल्या त्या समाजातल्या मुलाची भाषा 'भाषा मूळ अडाण्याची' या सूत्राला धरूनच असणार, हे लक्षात येईल.

समाजाचा जीवनव्यवहार तेव्हा 'आहार, निद्रा, भय, मैथुन' यांच्या परिघात पुरा होत असल्याने (शिकार आहार-भयांशी संबंधित होती) या भाषेची चिह्नसंपत्ती मर्यादित असेल. वस्तुमय संस्कृती वाढत गेली, तेव्हा आणखी चिह्नांची म्हणजे शब्दांची गरज पडू लागली. ती त्या अडाण्यांनीच आपल्या कुवतीने पुरी केली. त्यासाठी, स्वभाषेत उपलब्ध शब्दांवरून बोलीत सारखण आणि अर्थांतराचे उपयोजन झाले. ते अरूपांच्या पातळीवरसुद्धा झाल्याचे दिसते.

मराठी ग्रामीण बोलीतले शेतीचे शब्द, मराठी अडाण्याची बोली, लई हा अतिशयतेचा शब्द, आमा-आंबा, कऱ्हा, मातीच्या भांड्यांची नावे, वेद-वेदि इत्यादी भारतीय शब्द यांच्या उदाहरणांनी भाषचिह्नांच्या सारखण-अर्थांतरांनी मानवी

वस्तुमय संस्कृतीच्या नव्या शब्दांची घडण झाल्याचे गेल्या २५ वर्षांत दाखवले आहे. (संदर्भाची यादी शेवटी आहे.) एकोणिसाव्या शतकातील इंडो-युरोपियन भाषाशास्त्र, आर्य वगैरे मानववंशांचा भाषांशी जोडलेला संबंध, मराठीचा उद्‌भव संस्कृत भाषेतूनच सिद्ध करण्याचा अट्टाहास या सगळ्यांचा फेरविचार करण्याची गरज त्यात अधोरेखित झाली आहे.

**६. चिह्नाच्या आशयाचे महत्त्व**

भाषेचे उगमस्थान असलेल्या अवयवाला मेंदू हे नाव कसे मिळाले असेल? मेंदू हा एरवी न दिसणारा पदार्थ आहे. कधी कुणाचे डोके फुटल्यामुळे तो दिसला तेव्हा, त्याच्यासारखा दिसणारा, मोहोळातले मेण हा आदिम जीवनातला अधिक ओळखीचा पदार्थ पाहणाऱ्याला आठवला. त्याने केवळ रूपाच्या सारखेपणावरून, मेंदूला मेणावरून नाव दिले. तिकडे लॅटिनमध्येही cerebrum या शब्दाच्या मुळाशी ceres म्हणजे मेण हाच शब्द आहे. मेण आणि ceres यांच्यात ध्वनिसाम्य नाही; संकल्पनासाम्य आहे. एकमेकांपासून दूर असलेल्या, मानवत्व हा एकच समान धागा असलेल्या दोन समाजांच्या बोलीमध्ये मेंदूवाचक शब्दात ते संकल्पनासाम्य आले. शब्दांच्या तुलना करताना बोलांच्या ध्वनीपेक्षा 'भाष'चा, चिह्नाचा आशय महत्त्वाचा असतो, हे यावरून लक्षात यावे.

अमेरिकेतले मूळ रहिवासी ('रेड इंडियन') आपले सामान दांड्यांवरून ओढून नेण्यासाठी व शिकारीसाठी कुत्रे पाळीत. १६ व्या शतकातील स्पॅनिश आक्रमणानंतर त्यांना घोडा माहीत झाला. या नव्या प्राण्याची चाल आणि उपयोग कुत्र्यासारखाच आहे, हे पाहून ('सारखणा'ने) त्यांनी आपल्या बोलीत 'बडा कुत्रा' अशा अर्थाचे त्याचे नाव ठेवले.

मराठीतल्या 'कुत्रे' या शब्दाचे, दक्षिणी भाषांतील 'घोडा' या अर्थाच्या 'कुतिरै, कुदरे' या शब्दांशी साम्य आहे, 'कुति = उडी मारणे, खेळणे, थयथय नाचणे' या मूळ शब्दावरून या साम्याचे संकल्पनात्मक कारण कळते. याचप्रमाणे वेदातील 'हरि, अश्व' या शब्दांचा साम्यसंबंध दक्षिणी, 'परि, हरियुनि = धावणे, धाव, घोडा' आणि 'असैवु = हलवणे, झुलणे, असवय = घाई, गडबड' या शब्दांशी लागतो.

खुद्द संस्कृत प्राचीन ग्रंथांमध्ये ध्वनीवरून शब्दांची उपपत्ती बसवण्याची दृढ परंपरा चालत आली आहे. 'शतपथ ब्राह्मण' ग्रंथात सांगितले आहे की, "अश्व हे नाव त्याला मिळाले; कारण की, प्रजापतीचा डोळा सुजला (अश्वयत्) आणि

त्यातून तो पडला (परापत्)." (१३.३.१.१) किंवा "अग्नी या गर्भाबरोबर बाहेर येणाऱ्या गर्भजलाला गूढ अर्थाने अश्व म्हटले." (६.१.१.११) याला पाणिनीय परंपरेचे प्रामाण्य नसेल, पण असली स्पष्टीकरणे अर्थशून्य आहेत, असे ठामपणे आजही संस्कृत अभ्यासक सांगत नाहीत, हे शोचनीय आहे.

प्रचलित इंडोयुरोपियन व्युत्पत्तीत संस्कृत अश्व, ग्रीक एक्युउस्, लॅटिन हिप्पॉस हे शब्द तुल्यध्वनीचे आहेत, हे सिद्ध करण्यासाठी ध्वनींच्या अनेक प्रक्रियांची कल्पना करावी लागली. अरूपाच्या किंवा संकल्पनेच्या पातळीवर पाहिले, तर ग्रीकमध्ये 'सारखे म्हणजे पाय दोन बाजूंना टाकून बसणे' आणि लॅटिनमध्ये 'चौखूर झेपावणे' या त्या भाषांतल्या वेगळ्या अर्थांच्या शब्दांवरून हे शब्द आलेले दिसतात. त्यामुळे भाषा या चिह्नव्यवस्थेच्या गाभ्याशी जाता, संस्कृत शब्दांचा संबंध ग्रीक-लॅटिनपेक्षा भारतीय लोकभाषांशीच असल्याचे दिसते. या संदर्भात डॉ. केतकरांचे विधान लक्षणीय आहे : (प्राचीन महाराष्ट्र : भाग १-२)

संस्कृत भाषा कोणत्या तरी ठिकाणच्या प्राकृतापासून तयार झाली आणि ती हळूहळू तयार झाली. (पृ. ४३०)

ख्रि.पू.२००० या काली किंवा त्याच्याहि अगोदर आर्य-द्रविड संबंध उत्पन्न झाला असणे शक्य आहे. (पृ. ४३५)

समाजशास्त्रज्ञ केतकरांच्या या तर्कांना वरील विवेचनाने पुष्टी मिळते.

घोडा या अर्थाच्या शब्दांना मानवी आणि भाषिक विकासाच्या इतिहासात काहीसे विचित्र महत्त्व आले आहे. जगातले सर्वात जुने मानलेल्या वेदसाहित्यात हे शब्द असल्यामुळे वेदाचे रचनाकार आर्य वंशाचे होते, असे ठरवण्यात आले. ग्रीक-लॅटिन शब्दांशी (कष्टाने सिद्ध केलेले) साम्य आर्य वंशाची व्याप्ती दाखवते, असे ठरले. त्या वंशाच्या लोकांनी घोड्याच्या जोरावर आपल्यापूर्वीच्या सिंधु-संस्कृतीवर विजय मिळवला, असे मत मांडण्यात आले.

संकल्पना आणि ध्वनी या दोन्ही अंगांनी संस्कृतशी भारतीय लोकभाषांचे साम्य ग्रीक-लॅटिनपेक्षा अधिक आहे. त्यामुळे या मानव इतिहासप्रणाली अस्वीकार्य ठरतात. या प्रणालीच्या भाषाशास्त्राला 'इंडो-युरोपियन उपपत्ती' हे नाव आहे.

**७. चिह्नाशयांनी व्युत्पत्ती**

इंडो-युरोपियन उपपत्तीची मांडणी विल्यम जोन्स यांच्यापेक्षा जास्त तपशिलाने बोप्प यांनी केली होती. सोस्यूर यांनीही तरुणपणी या उपपत्तीच्या अनुरोधाने विद्वन्मान्य संशोधन केले होते. तरी त्यांच्या नव्या भाषाविचाराच्या

संदर्भाने सोस्यूर या उपपत्तीविषयी म्हणतात,

"जुनी शिष्ट रीत शब्दांची विभागणी धातू, सामान्यरूप, प्रत्यय इत्यादी प्रकारांत करून या भेदांना एक परम मूल्य चिकटवीत असे. बोप्प आणि त्यांच्या शिष्यांचे लेखन वाचताना आपल्याला असे वाटेल की, ग्रीकांनी अनादिकाळापासून आपल्याबरोबर धातू आणि प्रत्यय यांचे एक गाठोडे बाळगले होते; आणि त्याचा उपयोग ते शब्द बनवण्यासाठी करीत; आणखीही असे की, ते बोलता-बोलता आपले शब्द उत्पादण्याचे काम करीत. उदाहरणार्थ, त्यांच्या लेखी पातेर् (पिता) म्हणजे पा धातू + तेर् प्रत्येय ..इ." (उक्त पृ. १८४)

या अवतरणाचा रोख स्पष्ट आहे. सोस्यूर यांचा ग्रंथ त्यांच्या निधनानंतर शिष्यांनी व्याख्यानाच्या टिपणांवरून संकलित केला आहे, हे आपणाला माहीत आहे. त्यांना अधिक आयुष्य लाभते आणि त्यांनी स्वतः ग्रंथ लिहिला असता, तर बहुधा, त्यांनी चिह्नाशयांवर आधारित व्युत्पत्तीचा पुरस्कार केला असता.

दुर्दैवाने ते झाले नाही. भारतीय भाषांपुरते बोलायचे तर, त्यांचा संकलित ग्रंथ फ्रेंचमध्ये प्रकाशित झाला. त्याच्या आदल्या वर्षी, सोस्यूर यांनी टिप्पणी केलेल्या व्युत्पत्तिपरंपरेलाच पूर्णपणे अनुसरणारा, झूल ब्लोक यांचा 'मराठीची घडण' हा ग्रंथ फ्रेंचमध्येच प्रकाशित झाला. ब्लोक यांनी आरंभालाच सांगितले आहे की,

"मराठी संस्कृताहून वेगळ्या भाषेपासून निघालेली असावी, असे दिसत नाही आणि मराठीचा इतिहास लिहिणे काय किंवा संस्कृतच्या विशिष्ट भाषिक रचनेमध्ये कालवशाने जे फेरफार झाले, त्यामुळे मध्य हिंदुस्थानात प्रथम अनेक प्राकृत भाषांची कशी उत्पत्ती झाली व त्यानंतर ती कशी निर्माण झाली, हे दाखवणे काय, दोन्ही एकच आहे."

एका अर्थाने संस्कृत भाषेला परंपरेनुसार 'अपौरुषेय' मानून केलेल्या भारतीय भाषांच्या उत्पत्तीची काहीशी अस्वाभाविक प्रक्रिया या अवतरणात व्यक्त झाली आहे. त्या प्रक्रियेच्या गृहीतामुळे ब्लोक यांच्या ग्रंथातल्या व्युत्पत्ती चिह्नाशयापेक्षा ध्वनींवर आधारलेल्याच आहेत. ब्लोक यांचे शिष्य डॉ. परांजपे यांनी त्यांचा ग्रंथ १९४१ साली मराठीत आणला. त्यांचे दुसरे शिष्य डॉ. कालेलकर यांचे 'ध्वनिविचार' हे पुस्तक १९५५/१९८७ साली आले. त्यात व्युत्पत्ती प्रकरणात (पृ. ७६) 'घोडा' शब्दाचे मूळ सं. 'घोटक' असे दिले आहे. प्रस्तावनेत

मात्र म्हटले आहे की,

ऐतिहासिक दृष्टीने पाहिले तर 'घोडा' या शब्दाचे ते संस्कृतीकरण असणेही शक्य आहे. (सतरा)

भारतीय भाषांच्या संदर्भात या प्रकारच्या विसंगती टाळणारा 'संमत' भाषाविचार स्वीकारून भाषा या चिह्नव्यवस्थेचा मानवी मेंदूशी संबंधित विचार केल्याशिवाय 'मानवी विकास आणि भाषा' यांचे अंत:संबंध आपल्याला नीटपणे उलगडणार नाहीत.

**संदर्भ :**

*विश्वनाथ खैरे*

*मराठी भाषेचे मूळ, मराठी संशोधन मंडळ, १९७९ पृ. ८८-९४*

*अडगुलं मडगुलं, संमत प्रकाशन २००१ पृ. ९८-१०७*

*'लई व्युत्पत्ती नको' : नवभारत, मे-जून १९९७ पृ. ६२-६६*

*'दक्षिणी मराठी भारती देशीपण' : नवभारत, नोव्हें.-डिसें १९९९ पृ. ७३-८०*

*साहित्य मिथ्य साहित्य : संमत प्रकाशन २०००*

*'प्रचलित भारतविद्या आणि संस्कृत पुराणकथा' : नवभारत, डिसें. - जाने. २००२*

*Miracles, Myths and Words : Samanvaya : World Philosophers Meet, Pune 1996 pp 216-236*

*निबंधातील वैज्ञानिक माहितीसाठी पुढील संदर्भांचा उपयोग केला आहे :*

*Course in General Linguistics Tr. : Ferdinad de Saussure : Pater Owen, 1960*

*The Adventure of Man : Arthur Gregor : Bantam Books, 1967*

*The Origin of the Human Race : V P Alexeev : Progress Publishers, Moscow, 1986*

*Physiology of the Human Body : Arthur C Guyton : Holt-Saunders International Editions, 1984*

*Scientist in the Crib : Alison Gopnik, Andrew N Meltzoff, Patricia K Kuhl; Perennial, 2001*

*Encyclopaedia Britannica 14th Ed. Vol VIII, pp, 1030-36 - Homo Erectus, pp 1043-52 Homo Saplens*

*Poetry and Mathematics : Scott Buchanan; Keystone Edition, 1962*

*The Machine as Metaphor and Tool : Herman Haken, Anders*

*Karlqvist, Uno Svedin: Springer Verlag 1993*
*(दि. १ आणि २ मे रोजी झालेल्या 'भाषिक नीती आणि व्यवहार' या चर्चासत्रातील निबंध)*

■

३७४, सिंध सोसायटी, औंध, पुणे - ४११ ००७

## 'मराठी'ची अस्मिता (?)

मराठी शब्द अस्तित्वात असूनही त्यांच्याऐवजी इंग्रजी शब्द वापरले जाण्याचे एक कारण बहुधा निष्काळजीपणा हे असावे. आपल्याला केवळ मराठीच येते असे नाही तर इंग्रजीही येतं असं समोरच्या माणसाला दाखवणं हे दुसरं कारण असू शकेल. असे इंग्रजी शब्द वापरले की भाषेचा डौल वाढतो असा समज असावा. ......इंग्रजी शब्द वापरल्याने ऐकणाऱ्यावर आपला प्रभाव पडेल, त्याला आपला मुद्दा पटेल असं बोलणाऱ्याला उगीचच वाटत असावं. इंग्रजी शब्द वापरणं हा आपल्या आधुनिकपणाचा एक पुरावा असल्याची काहीजणांची समजूत असावी. बहुधा अशा समजुतींमुळेच अनेक दुकानांच्या पाट्या देवनागरी लिपीत पण इंग्रजीत असल्या पाहिजेत असे दुकानदारांना वाटते. या पाट्या ही या संदर्भात चिंतेची गोष्ट आहे. माझ्याकडे मराठी शिकणाऱ्या दोघा अमेरिकन विद्यार्थ्यांनी उत्साहाने दुकानांवरच्या देवनागरीतल्या पाट्या वाचायला सुरुवात केली आणि ते चकितच झाले कारण त्यांना वाचायला मिळाली ...'मिनी-मार्केट', 'मेडिकलस्टोअर', 'हार्डवेअर मर्चंट', 'टिंबरमार्ट', 'चारकोल डेपो' इत्यादी नावं. फुलांचा दुकानदार हा 'फ्लोरिस्ट' असतो आणि अनेक दुकानेही 'एंटरप्रायजेस' असतात असा सगळा इंग्रजी शब्दांचा 'बाजार'! खेड्यांमधूनसुद्धा दुकानांवर अशाच पाट्या असतात. हे सर्व खरोखर अपरिहार्य आहे का? औषध दुकान, कापड दुकान, लोखंडी सामान हे शब्द वापरले तर नाही का चालणार? आपली मराठीची अस्मिता बहुदा १ मे आणि शिवजयंतीला जागी होऊन ललकाऱ्या देते आणि मग झोपी जाते.

■

**(सुप्रिया सहस्रबुद्धे - 'आपण हे शब्द मराठीत वापरतो का?'**
**'स्त्री' फेब्रु. २००२, पृ. ४८)**

# एका संशोधन - समर्पित जीवनाचं विहंग दर्शन

**कल्याण काळे**

डॉ. सुधाकर बाळकृष्ण कुळकर्णी (जन्म - ३० जून १९३४, मृत्यू २९ ऑक्टोबर २००१) यांचा जन्म कोकणातील रायगड जिल्ह्यातील तळे या खेडेगावात एका चांद्रसेनीय कायस्थ प्रभू कुटुंबात झाला. त्यांचे आजोबा गावचे खोत असून समाजकार्यांची त्यांना आवड होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अस्पृश्यता विमोचन चळवळीतील ते सक्रिय कार्यकर्ते होते. सु.बां.चे वडील खोती आणि मोटार वाहतुकीचा व्यवसाय करत. सु.बा. हे नऊ भावंडांतले क्रमांकाने दुसरे. त्यांचे प्राथमिक शिक्षण तळे येथे झाले. लहानपणापासून त्यांच्यावर राष्ट्र सेवादलाचे संस्कार होते. राष्ट्र सेवादलाच्या प्रभात फेऱ्या, मोर्चे, हरताळ इ. उपक्रमात ते लहानपणी भाग घेत असत. लहानपणी त्यांनी गायिलेल्या स्वातंत्र्यगीतावर खूष होऊन पू. साने गुरुजींनी त्यांची पाठ थोपटली होती.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारत सरकारने खोती नष्ट केली. मोटार वाहतुकीच्या उपर्जीविकेचे साधनच नष्ट झाले. त्यामुळे सु.बां.चे शिक्षण खंडित झाले. ते गाव सोडून मुंबईला आले. दिवसा कारखान्यात काम करून रात्रीच्या शाळेत शिक्षण घेऊ लागले. १९५३ साली ते एस्.एस्.सी.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. १९५४ साली त्यांनी. डे.ए. सोसायटीच्या बॉम्बे कॉलेजमध्ये प्रवेश घेतला आणि कंपाउंडर, कंडक्टर, वायरमन, सेल्समन, कारकून अशा मिळतील त्या नोकऱ्या पत्करत त्यांनी आपलं शिक्षण पुरं केलं. मराठी आणि इंग्रजी साहित्य हे विषय घेऊन १९६० मध्ये ते एम्.ए. झाले. त्यानंतर २-३ वर्षं त्यांनी हायस्कूलमध्ये शिक्षकाच्या नोकऱ्या केल्या. त्या करत असतानाच प्रा. अ.का. प्रियोळकर यांच्या प्रेरणेने ते भाषाविज्ञानाच्या अभ्यासाकडे वळले. त्यांनी सागर, कर्नाटक व उस्मानिया विद्यापीठातील उन्हाळी शिबिरातून भाषाविज्ञानाचे शिक्षण घेतले आणि १९६३ साली त्यांनी भाषाविज्ञानाची पदविका मिळविली. त्यांची भाषाविज्ञानातील गती पाहून डॉ. शं.गो. तुळपुळे यांनी पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागातील बोली प्रकल्पावर संशोधन साहाय्यक म्हणून एप्रिल १९६४ मध्ये त्यांची नेमणूक केली. तेथे त्यांनी दोन वर्षं काम केले. पण या दोन वर्षांच्या अल्प काळात त्यांनी



अनुक्रमणिका






महाराष्ट्र, गोवा, कर्नाटक व गुजरात या चार राज्यांतील सोळा जिल्ह्यांत फिरून त्या त्या जिल्ह्यातील प्रातिनिधिक ग्रामीण बोलींचे प्रत्येकी अडीच हजार पायाभूत शब्द गोळा केले. हा कोश अनेकांच्या सहकार्याने तयार झाला. त्यात सु.बां.चा सिंहाचा वाटा होता. याच काळात त्यांनी व डॉ. तुळपुळे यांनी 'ग्रॅमॅटिकल स्केच ऑफ मराठी' हे मराठीचे वर्णनात्मक व्याकरण लिहिले. ते भारत शासनाच्या भाषा विभागाने प्रसिद्ध केले. त्यानंतर डॉ. मु. श्री. कानडे यांच्या सहकार्याने त्यांनी 'ज्ञानेश्वरी-टिपण' या प्राचीन ज्ञानेश्वरी कोशाचे संपादन केले. पुणे विद्यापीठाने तो प्रकाशित केला आहे.

इ.स. १९६६ साली सु.बां.ना हवी असलेली संधी चालून आली. त्यांना डेक्कन कॉलेजमधील मराठी-बोली-सर्वेक्षण या प्रकल्पामध्ये क्षेत्र-संशोधक म्हणून नोकरी मिळाली. या प्रकल्पामध्ये त्यांनी पाच वर्षं नोकरी केली. या प्रकल्पाचे प्रमुख डॉ. अ. मा. घाटगे हे होते. या पाच वर्षांच्या काळात सु.बां.नी (१) काणकोणची कोकणी, (२) ठाण्याची वारली, (३) कासरगोडची मराठी, (४) रहाटाडची कोळी आणि (५) डांगची भिल्ली या पाच बोलींचं विश्लेषण केलं आणि त्यांची व्याकरणं सिद्ध केली. त्यातील पहिली तीन पुस्तकं महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केली. पाचवं डेक्कन कॉलेजच्या भाषाविज्ञान प्रगत अध्ययन केंद्राने प्रसिद्ध केलं.

याच काळात सु.बां.नी डॉ. घाटगे यांच्या मार्गदर्शनाखाली कातकरी समाजाच्या बोलीचा अभ्यास करून 'डिस्क्रिप्टिव्ह ॲनॅलिसिस ऑफ कातकरी डायलेक्ट' हा प्रबंध तयार करून त्यावर भाषाविज्ञानातील पीएच्.डी. ही पदवी संपादन केली (१९७०). त्यानंतर त्यांनी भाषाविज्ञानातील एम्.ए. ही पदवी मिळविली (१९७२). आधी पीएच्.डी. आणि नंतर एम्.ए. असा हा उलटा प्रकार होता. या प्रकल्पात काम केल्याने 'सु.बा.' हे बोलींचा अभ्यास या क्षेत्रामध्ये विशेषज्ञ झाले. ही योग्यता त्यांनी खूप परिश्रमांनी प्राप्त केली आहे. कोणत्याही बोलीचा अभ्यास करण्यासाठी ते ती बोली बोलणाऱ्या समाजात जाऊन महिना-दोन महिने राहत असत. त्या लोकांत मिळून-मिसळून राहून ते त्यांची मनं जिंकून घेत. त्यांच्यातील योग्य निवेदक निवडून घेऊन त्यांच्या मदतीने त्या बोलीच्या भाषिक सामग्रीची जमवाजमव करत असत आणि नंतर यथावकाश त्या सामग्रीचं विश्लेषण करून त्या बोलीचा कोश, तिचं व्याकरण इ. सिद्ध करत असत. प्रत्यक्ष क्षेत्रीय अभ्यास करून विविध बोलींची व्याकरणं तयार करणारा सु.बां.सारखा

अभ्यासक महाराष्ट्रातच काय; पण संपूर्ण भारतात तरी सापडेल की नाही याची शंकाच आहे.

या प्रकल्पाचं काम बंद झाल्यावर सु.बां.नी. केंद्र सरकारच्या 'भारतीय भाषा संस्थान' या संस्थेच्या पुणे येथील 'पश्चिम विभागीय भाषा केंद्र' या संस्थेत मराठी भाषेचे अध्यापक म्हणून दोन वर्षं (१९७१ ते १९७३) नोकरी केली. तेथे अमराठी भाषकांना मराठी भाषा शिकवण्याचं काम त्यांना करावं लागलं. या कामाच्या अनुषंगानं त्यांनी 'मराठी फोनेटिक ड्रिल्स्' ही पुस्तिका सिद्ध केली.

जून १९७३ मध्ये त्यांची नागपूर विद्यापीठात भाषाविज्ञानाचे प्रपाठक म्हणून नियुक्ती झाली. जून १९७६ मध्ये ते विद्यापीठाच्या 'भाषाविज्ञान, परकीय आणि भारतीय भाषा' विभागाचे प्रमुख झाले. तेव्हा त्यांनी या विभागाच्या विकासाकडे लक्ष पुरवायला सुरुवात केली. प्रतिकूल परिस्थितीतही एखादा प्राध्यापक विभागासाठी काय करू शकतो, याचा आदर्श सु.बां.नी नागपूरला घालून दिला आहे. त्यांनी प्रथम विभागातील पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरू करण्याकडे लक्ष दिले. प्रथम त्यांनी पदव्युत्तर पदविका वर्ग सुरू केले. त्यानंतर क्रमाने एम्.ए.चे वर्ग, त्यानंतर एम्.फिल्., पीएच्.डी.ची सोय केली आणि विभाग परिपूर्ण केला. भाषाविज्ञानाला विद्यार्थी हवेत म्हणून सु.बां.नी नागपुरातील कॉलेजा-कॉलेजात हिंडून तेथील भाषाविषयाच्या प्राध्यापकांना भाषाविज्ञानात एम्.ए., पीएच्.डी. करण्याबद्दल उद्युक्त केलं. त्यांना सोयीचं जावं म्हणून नागपूर विद्यापीठाच्या शहरात मध्यवर्ती ठिकाणी असलेल्या ग्रंथालय इमारतीत विभागाचे रात्रीचे वर्ग सुरू केले. त्यामुळे नोकरी करून शिकणाऱ्या अनेक अभ्यासकांची सोय झाली आणि अल्प काळातच विभाग विद्यार्थ्यांनी गजबजून जाऊ लागला. नागपुरात भाषाविज्ञानाचं अध्ययन केलेले अनेकजण आढळतात. त्यापैकी अनेकांनी 'आपण 'सु.बां.'मुळे भाषाविज्ञानाकडे वळलो', असं त्यांना श्रेय दिलं आहे. हळूहळू विभागात लँग्वेज लॅबोरेटरीची स्थापना झाली. त्यांच्याच कारकीर्दीत भाषाविज्ञानातील पीएच्.डी.साठी निरनिराळ्या विषयांवर विभागात संशोधन होऊ लागलं. कोशकार्य, बोली, आदिम भाषा व संस्कृती, प्राचीन भाषा यासारखे विषय निवडले जाऊ लागले. सु.बां.च्या मार्गदर्शनाखाली अनेक विद्यार्थ्यांनी निरनिराळ्या बोलींचे अभ्यास केले. भाषाविज्ञानाबरोबरच जर्मन, फ्रेंच, रशियन या परकीय भाषा आणि बंगाली, गुजराती, सिंधी, पंजाबी या भाषांच्या शास्त्रोक्त अभ्यासासाठी अभ्यासक्रम तयार करण्यांत आले. चौदावी अखिल भारतीय भाषाविज्ञान परिषद

नागपुरात भरवण्यात आली. सु.बां.च्या पुढाकाराने 'लिंग्विस्टिक सर्कल ऑफ सेंट्रल इंडिया' या संस्थेची स्थापना झाली.

या सर्व व्यापाबरोबर सु.बां.नी विद्यापीठाच्या प्रशासकीय कार्यातही रस घेतला. ते सिनेटचे सदस्य झाले. ते कलाशाखेचे अधिष्ठाता झाले. विद्यापीठाच्या अनेक समित्यांवर त्यांची नेमणूक झाली. सु.बां.च्या कर्तृत्वाला या काळात बहर आला होता. एक सळसळतं चैतन्य त्यांच्या रूपाने विद्यापीठात वावरत होतं.

हे सर्व चालू असताना सु.बां.चं संशोधन-कार्य चालूच होतं. अनेक विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच्.डी.चं संशोधन केलं; निरनिराळ्या बोलींचे अभ्यास झाले. त्यांच्याच एका विद्यार्थ्याच्या - डॉ. हरिश्चंद्र बोरकरांच्या - झाडी बोलीवरील प्रबंधाला पुण्याच्या मराठी अभ्यास परिषदेचं महाबँक पारितोषिक मिळालं. या काळात सु.बां.नी गोंडी बोलीचा अभ्यास केला. तिचं व्याकरण सिद्ध केलं. तिचा कोशही तयार केला. त्यांनी कोकणीचाही अभ्यास करून तिच्यावर एक पुस्तक तयार केलं. हे पुस्तक प्रसिद्ध झालं, तर मराठीवादी पक्षाच्या गोटात खूप खळबळ माजेल, असं त्यांना वाटत होतं. त्यांची गोंडीवरील पुस्तकं आणि कोकणीवरील हे पुस्तक ही दोन्ही अप्रकाशितच राहिली आहेत.

गेल्या दहा-बारा वर्षांत त्यांच्या प्रतिभेनं वेगळंच वळण घेतलं होतं. त्यांनी आपलं लक्ष मध्ययुगीन साहित्याच्या अभ्यासावर केंद्रित केलं. विशेषतः ज्ञानदेव, नामदेव, जनाबाई यांच्या चरित्रांचा उलगडा करण्याचं अवघड काम त्यांनी सुरू केलं होतं. त्यांचे या विषयांच्या संदर्भातले क्रांतिकारक लेख युगवाणी, नवभारत, महाराष्ट्र टाइम्स, लोकमत (साहित्य-जत्रा पुरवणी) इ. नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊ लागले. एप्रिल १९८९ ते जून १९९७ या आठ वर्षांच्या काळात या विषयांवरील त्यांचे २३ अभ्यासपूर्ण लेख प्रसिद्ध झाले. या सगळ्या लेखांत लोकांच्या सर्वसामान्य समजुतींना धक्का देणाऱ्या उपपत्ती मांडावयाच्या असल्याने त्यांनी ते लेख खूप काळजीपूर्वक लिहिले आहेत. त्या लेखांची पूर्वतयारी त्यांनी ३० वर्षांपूर्वीच सुरू केली होती. निरनिराळ्या हस्तलिखितांची माहिती मिळवणं, त्यांच्या प्रती मिळवणं, ती माहिती मिळवण्यासाठी पदरमोड करून संशोधन-यात्रा करणं, अशी ही कामं नित्याचे व्याप सांभाळून चालूच होती. ही कामं करताना त्यांनी खर्चाची पर्वा केली नाही; कष्टांमध्ये कसूर केली नाही. पुण्यामध्ये ह.भ.प. सुबंधांच्या वंशजांची भेट घेण्यासाठी त्यांचा पत्ता शोधीत ते किती तरी वेळ भटकत होते. डॉ. कोपर्डेकरांनी संपादित केलेली 'भैरवी टीका' मिळविण्यासाठीही त्यांनी

बरीच मोठी रिक्षा-दौड केली होती.

त्यांच्या या लेखांमधून त्यांनी खूपच उत्पातकारी विचार मांडलेले आहेत. ज्ञानेश्वरांचा काळ शके ११२२ ते १२०२ असा होता; त्यांनी जगाचा पूर्ण अनुभव घेतल्यानंतरच ज्ञानेश्वरी लिहिली. ते देवगिरीच्या रामदेवरावाचे गुरू होते. रामदेवरावाने हेमाद्रि पंडितामार्फत ज्ञानेश्वरीची एक प्रत सच्चिदानंदी प्रतीच्याही अगोदर म्हणजे शके १२०८ साली तयार करवून घेतली होती; ज्ञानेश्वर ८०व्या वर्षी मरण पावले; संत नामदेवांची आयुर्मर्यादाही शके ११२९ ते १२०९ अशी होती. ते पंजाबात गेलेच नव्हते. मराठीच्या मध्ययुगीन कालखंडात एकूण चार नामदेव होऊन गेले आणि त्या सर्वांच्या रचनांची सध्याच्या नामदेवगाथ्यात खिचडी झालेली आहे. इ.स. १४९८ ते १५९९च्या सुमारास झालेले विष्णुदास नामा हे शिंपी कवी फार प्रतिभावान होते. तेच पंजाबात गेले होते. जनाबाई ही त्यांचीच शिष्या होती. ज्ञानेश्वरचरित्राची आदि, तीर्थावळी आणि समाधि ही प्रकरणे याच विष्णुदास नामा यांनी लिहिली आहेत. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई ही मुळात भावंडं नसून निरनिराळ्या काळात निर्माण झालेले वेगवेगळे सत्पुरूष होते; पण पुढच्या काळात लोकधारणेने त्यांना भावंडं बनवून ज्ञानदेव चरित्राची मिथ्यकथा तयार केली. जनाबाईसुद्धा दोन होऊन गेल्या. अभंग रचणारी जनाबाई विष्णुदास नामा यांची शिष्या होती. असे अनेक धक्कादायक निष्कर्ष त्यांनी या संशोधनातून काढले आहेत.

सु.बा. स्वतःला नास्तिक म्हणवत असत. ते कसे काय या संशोधनाकडे वळले, असा मला प्रश्न पडला होता. त्याबद्दल त्यांना विचारलं असता ते म्हणाले होते, "या संशोधनानं माझ्या नास्तिकतेला बाधा येत नाही. संतचरित्रांबद्दल मला जे प्रश्न पडले, त्यांचा उलगडा करण्यासाठी मी या संशोधनाला प्रवृत्त झालो. मी आज गेली तीस वर्षं याविषयी चिंतन करतो आहे. मला अनुकूल पुरावे मिळत गेले, तसतसे मी मांडत गेलो." हे त्यांचं संशोधन उपेक्षेनं मारलं जाऊ नये, ते अभ्यासकांपर्यंत पोचावं, त्यावर चर्चा व्हावी, अशी माझी खूप इच्छा होती. म्हणून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या राक्षे व्याख्यानमालेमध्ये त्यांनी या संशोधनावर व्याख्यानं द्यावीत म्हणून मी दोन तीन वर्षं प्रयत्न करत होतो; पण त्यांच्या ढासळत्या प्रकृतीनं त्यांच्या संचारावर बंधनं आणली होती. त्यामुळे त्यांची व्याख्यानं ऐकण्याचा योग पुणेकरांना कधीच आला नाही. प्रसिद्ध झालेल्या या प्रत्येक लेखाची प्रत तो लेख प्रसिद्ध होताच ते माझ्याकडे पाठवत राहिले. त्यामुळे त्यांचे हे सर्व लेख आज माझ्या संग्रही आहेत. कोणी साक्षेपी प्रकाशकाने त्यांचं

हे क्रांतिकारी संशोधन ग्रंथरूपाने प्रकाशित केल्यास मराठीच्या एतद्विषयक संशोधनात मोलाची भर पडणार आहे.

सु.बा. गेले. ते नास्तिक असले, तरी आस्तिक, श्रद्धाळू लोकांची त्यांनी कधी हेटाळणी केली नाही. ते सुजन होते; सहृदय होते. निरनिराळ्या आदिवासी जमातीच्या लोकांमध्ये प्रत्यक्ष जाऊन त्यांच्याबरोबर राहून ते केवळ त्यांच्या भाषांचाच अभ्यास करत नव्हते; तर त्यांच्या राहणीमानाचा, त्यांच्या चाली-रीतींचा, त्यांच्या श्रद्धा-समजुतींचा अभ्यासही करत होते. त्याचबरोबर समाजशास्त्रीय ग्रंथांचाही ते अभ्यास करत होते. त्या त्या जमातींची समाजशास्त्रीय माहिती ते गोळा करत होते. त्या लोकांच्या हालअपेष्टा पाहून अंतःकरणात व्यथित होत होते. प्रसंगी शक्य असेल, ती मदतही करत होते. नागपुरास गेल्यानंतर त्यांनी दलित, बहुजन, आदिवासी अध्यापकांना एकत्र आणून 'जनशक्ती फोरम'ची स्थापना केली होती. त्याद्वारे दलितांचे आणि आदिवासींचे प्रश्न समजून घेत होते. आजोबांच्या दलितांसंबंधीच्या कार्याचा थोडाबहुत वारसा त्यांच्यामध्येही आला होता.

सु.बां.चा स्वभाव मनमिळाऊ होता. त्यांना माणसं जोडण्याची कला चांगली अवगत होती. नागपूरला त्यांनी खूपच चांगला लोकसंग्रह केला होता. रिकामपणानं बसणं त्यांना कधी आवडत नसे. सतत ह्याच्याकडे जा, त्याच्याकडे जा, असं चालू असे. मला नेहमी प्रश्न पडत असे की, सु.बा. सारखे हिंडत-फिरत असतात, मग ते वाचन, लेखन कधी करतात? त्याबद्दल मी त्यांना विचारलं, तर त्यांनी सांगितलं की, मी पहाटे तीन वाजता नियमानं उठतो. जे काम चालू असेल, ते त्या शांत प्रहरात निवांतपणे करतो. काम नसेल, त्या वेळी मशेरी लावत चिंतन करत बसतो. त्यांच्याबरोबरच्या मुक्कामात त्यांची ही सवय मी डोळ्यांनी पाहिली आहे. निवांतपणी त्यांना मशेरी लावण्याची सवय होती. हा कार्यक्रम दिवसाही चालू असे. ते चांगले संभाषणपटू होते. त्यांचं बोलणं मार्मिक असे. त्याला विनोदाची धार असे. क्वचित् त्यांचा विनोद काही जणांना बोचरा वाटत असे. काही जणांना त्यांचे मूर्तिभंजनात्मक विचार आवडतही नसत. पण सु.बा. अंतःकरणाने निर्मळ होते. आपला कोणालाही त्रास होऊ नये, याची ते दक्षता घेत असत.

पुण्यावर त्यांचं मनापासून प्रेम होतं. डेक्कन कॉलेजवर ते बेहद्द खूष होते. त्यांना ते सोडून जाताना खूप वाईट वाटत होतं. नागपुरातही ते सतत डेक्कन कॉलेजच्या गोष्टी काढत. ते त्यांच्या दृष्टीनं Lost Horizon होतं. डेक्कन कॉलेजमध्ये नोकरी मिळवण्यासाठी त्यांनी खूप प्रयत्न केले; पण त्यात ते अपयशी

ठरले. पण त्या कॉलेजवरचं त्यांचं प्रेम अखेरपर्यंत कायम होतं. आपल्या जवळचा मोलाचा ग्रंथसंग्रह डेक्कन कॉलेजला देण्याचा संकल्पही त्यांनी बोलून दाखवला होता. त्यांच्या डेक्कन कॉलेजवरील प्रेमाची तुलना गडकऱ्यांच्या फर्ग्युसन कॉलेजवरील प्रेमाशीच होऊ शकेल.

■

**दीपक सहनिवास, ९२/३ तुळशीबागवाले नगर, गोळवलकर गुरुजी रस्ता, पर्वती, पुणे ४११ ००९.**

## डॉ. सु.बा. कुळकर्णी यांचे भाषाविषयक निवडक ग्रंथ व लेख

१. Descriprive Analysis of Katkari Dialect - 1970 पीएच्.डी.साठी लिहिलेला प्रबंध (अप्रकाशित)
२. जगन्नाथ बाळकृष्ण उगाउकरकृत ज्ञानेश्वरी टिपण - (संपादन डॉ. मु.श्री. कानडे यांच्या सहकार्याने) - पुणे विद्यापीठ, पुणे - ७, १९६८.
३. A Grammatical Sketch of Marathi (डॉ. शं.गो. तुळपुळे यांच्या सहकार्याने) - भाषा विभाग, भारत शासन, दिल्ली. १९७५
४. पोवारी बोली, नागपूर विद्यापीठ, १९७४, नागपूर.
५. Bhili of Dangs, Advanced Centre of Linguistics, Deccan College, Pune, 1976.

### लेख

१. द्राविड भाषा परिवार
पूर्वार्ध - नवभारत, ऑगस्ट १९७५ पृ. ३२-४३.
उत्तरार्ध - नवभारत, सप्टेंबर १९७५ पृ. ५७-६९.
२. बोलींचा अभ्यास - समावेश : भाषा व साहित्य : संशोधन, खंड १ला, संपा. डॉ. वसंत स. जोशी, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, नोव्हें. १९८१.
३. भाषिक परिवर्तन (स्वनपरिवर्तन व साहश्यमूलक परिवर्तन) पूर्वार्ध व उत्तरार्ध - समावेश - भाषाविज्ञान : वर्णनात्मक आणि ऐतिहासिक संपादक - डॉ. स. गं. मालशे, डॉ. हे. वि. इनामदार आणि डॉ. अंजली सोमण - संजय प्रकाशन, पुणे, १९८२.

## संत-वाङ्मयविषयक लेख

१. ज्ञानदेवाच्या आयुष्याचे कोडे - नवभारत, एप्रिल १९८९
२. ज्ञानदेवांचा कालखंड : काही नवी समीकरणे - युगवाणी ऑ-नो-डि. १९८९
३. ज्ञानेश्वरीचा लेखनकाल - नवभारत, एप्रिल १९९०
४. ज्ञानेश्वरीची हेमाद्रि-प्रत आणि तुका विप्र - नवभारत, जून १९९०
५. ज्ञानदेव आणि रामदेव : एक मणिकांचन योग - नवभारत, जुलै १९९०
६. मुक्ताबाईची रहस्यकथा - नवभारत, जाने. १९९१
७. ज्ञानेश्वरीतील शृंगारविश्व - युगवाणी, जुलै १९९१
८. मराठी अभिलेखातील सांकेतिक अंकलेखन आणि ज्ञानदेवांचा काळ :
   (१) युगवाणी, स-ऑ-नो १९९१
   (२) युगवाणी, जाने-फेब्रु. १९९२
९. ज्ञानदेवांचा कालखंड : काही भाषिक समीकरणे - नवभारत, जाने.-फेब्रु. १९९२.
१०. स्मृतिस्थळातील नामदेव - युगवाणी, मे-जून १९९२
११. संत नामदेवांची काशीयात्रा आणि महिकावतीची बखर - महाराष्ट्र टाइम्स, रविवार ५ जुलै १९९२
१२. नामदेव गाथ्यातील चार नामदेव - युगवाणी, जुलै-ऑगस्ट १९९२
१३. पंजाबातील नामदेव : विष्णुदासनामा - नवभारत, जा-फे-मा १९९३
१४. संत नामदेवांचे एक अपारंपरिक प्राचीन चरित्र - युगवाणी - मार्च-एप्रिल १९९३
१५. श्रीधराचे ज्ञानेश्वर-चरित्र - युगवाणी, ऑ-नो-डि १९९३
१६. नामदेव गाथ्यातील गौडबंगाल - लोकमत, रवि. २२-५-१९९४
१७. संत जनाबाई एक आगळे वास्तव - लोकमत, रवि. १७ जुलै १९९४
१८. उद्धवचिद्धनकृत ज्ञानेश्वर - चरित्राचा मूळपाठ - युगवाणी, ऑगस्ट-डिसेंबर १९९४
१९. सतीचे वाण - लोकमत, रविवार १८ सप्टेंबर १९९४
२०. संत नामदेवांची अस्सल वंशावळ - लोकमत, रवि. ९ जुलै १९९५
२१. विठ्ठलनाथकृत जनाबाई-चरित्र - संशोधक, जून १९९७

(टीप : सु.बा. कुळकर्णी स्वतः आपल्या आडनावाच्या लेखनात "ळ" असेच लिहित.)



# अटळ इंग्रजी

**गुरुचरण दास**

ब्रिटिशांनी हा देश सोडल्या दिवसापासून इंग्रजी भाषेबद्दल आपली कुरकूर चालू आहे. नव्वदच्या दशकात अचानक एकदा ही कुरकूर थंड झालेली दिसली आणि कोणत्याही समारंभावाचून शांतपणे इंग्रजीला भारतीय भाषांमध्ये स्थान मिळाले. गंमत अशी की हिंदुराष्ट्रवादी सत्तेवर येण्याच्या काळातच तिच्यावरचा वसाहतवादाचा कलंक पुसला गेला आणि त्यांना जाणवले की, हिंदी त्यांच्या गरजा भागवू शकत नाही. हिंदीच्या पुरस्कर्त्यांची श्रद्धाही ढासळली आणि त्यांच्या शिडातली हवा गेली. त्यांच्या स्वतःच्या कन्यांना इंग्रजी शिकून जगात पुढे यायचे होते आणि त्यांच्या पत्नींनी त्यांना आठवण करून दिली की, इंग्रजी हा त्यांच्या मुलाबाळांच्या भविष्याचा 'पासपोर्ट' होता.

**'लिंग्वास्फीअर** : रजिस्टर ऑफ द वर्ल्ड्स् लँग्वेजेस् अँड स्पीच कम्यूनिटीज्' (पृथ्वीचे भाषावरण : जागतिक भाषा आणि भाषिक समाजांची नोंदवही'.) या पुस्तकाचा लेखक आणि इंग्रजी भाषाशास्त्रज्ञ डेव्हिड डाल्बी यांच्या मते भारतातले सध्याचे वारे पाहता भारत हा २०१० वर्षांपर्यंत अमेरिकेला मागे टाकून जगातला सर्वांत मोठा इंग्रजी भाषिक देश बनेल. डाल्बीचे भाकीत असे आहे की, मग भारत हा 'इंग्रजी भाषेचा गुरुत्वमध्य' होईल. तेव्हा राममोहन रॉय आणि मेकॉलेच्या काळात इंग्रजी आणणे हे जितके औद्धत्याचे होते, तितकेच आज भारतातून इंग्रजी हटवण्याचा मानस धरणे औद्धत्याचे ठरेल.

माझ्या मते आता आपण इंग्रजी स्वीकारली आहे आणि ती इथे रुळली आहे याचे एक कारण असे आहे की, आता आपल्याला अधिक निर्भरता आणि आत्मविश्वास वाटतो आहे. आपल्यावरचे वसाहतवादाचे दडपण गेले आहे आणि आपल्या व्यवहारात 'इंग्लिश'चे वर्चस्व वाढत चालले आहे. गेली शंभर वर्षे उच्च आणि उच्चभ्रू मध्यमवर्गीय आपल्या बोलीभाषेत इंग्रजी शब्द मिसळत आले आहेत, पण सध्याची माध्यमांची टोळी म्हणजे नव्या उपग्रह आणि केबल वाहिन्यांचे अपत्य आहे. झी, सोनी आणि स्टार यांनी तर अनिर्बंधपणे हिंदी आणि इंग्रजीचा संकर केला आहे आणि जाहिरातदारांनी त्याला चांगलाच हातभार लावला आहे. नव्याने

उदयाला येणाऱ्या मध्यमवर्गाने बाजारातल्या या नव्या भाषाशैलीचा आतुरतेने स्वीकार केला आहे आणि ती वेगाने खालच्या सामाजिक, आर्थिक स्तरात झिरपायला लागली आहे. भाषाशुद्धीवाल्यांना ती पसंत नाही; पण आपल्यापैकी बऱ्याच जणांनी तिच्यापुढे मान तुकवली आहे. आपल्याला ठाऊक आहे, की भाषा अशाच तर उत्क्रांत होत असतात. दशकानुदशकांतून आपल्याला मोठ्या कष्टाने हा धडा शिकावा लागला आहे, की आपली इच्छा दुसऱ्यावर लादत बसण्यापेक्षा प्रवाहाबरोबर जाणेच बरे. बंगाल, गुजरात आणि इतरही ज्या राज्यांनी शाळांतून इंग्रजीला अर्धचंद्र दिला, त्यांनी लाखोजणांच्या भविष्यात अपयश वाढून दिले. या घातक प्रयोगाची माहिती आपल्याला आहेच.

आता इंग्रजी ही आपल्या भारतीय भाषांपैकीच एक ठरली आहे, ही दुःख करण्याचीही गोष्ट नाही आणि आनंद मानण्याचीही नाही. आजच्या जगाच्या रीतीला साजेसेच हे आहे. तंत्रज्ञानातल्या महत् क्रांतीमुळे जगाचा आकार लहान झालेला असताना इंग्रजी ही जगाची भाषा झाली आहे. तरीही, आश्चर्य या गोष्टीचे वाटते की, हिंदी राष्ट्रवाद्यांनी हिंदीला अधिक समृद्ध बनवण्यासाठी आणि त्यातून एक अधिक आकर्षक पर्याय उभा करण्यासाठी काही कष्ट घेतले नाहीत. त्यांनी जगातल्या सर्व थोर साहित्यकृती आणि शास्त्रीय ग्रंथांचे हिंदीत भाषांतर का केले नाही? गेल्या अर्धशतकात प्रादेशिक भाषांतील लेखनाचा बहर आपल्याला का पहायला मिळाला नाही? काही थोड्या चांगल्या लेखकांचा उदय झाला, हे निश्चित; पण ज्या नव्या प्रबोधनाची आपल्याला आशा होती, ते मात्र झाले नाही.

दुःखाची गोष्ट अशी की, आपल्या स्वतःच्या भाषेबद्दल ती बोलणाऱ्यांना आदर वाटत नाही. आयांना आपली मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळेतच घालणे जास्त पसंत असते. इंग्रजी शिकणे हा सुद्धा अधिक चांगला उद्योग आहे. गेली दीडशे वर्षे देशी भाषांच्या विरुद्धच परिस्थिती तयार होत गेली, त्या बाबतीत आपल्या भाषातज्ज्ञांनी काही कृती केली नाही. कारण काही असो, अधिकाधिक भारतीयांना मातृभाषेपेक्षा इंग्रजी भाषेतच बोलणे अधिक सोपे वाटायला लागले आहे. अजून ते अल्पसंख्य आहेत; पण ही प्रवृत्ती आणखी एक-दोन पिढ्या अशीच राहिली, तर एके दिवशी हे अल्पसंख्य बहुसंख्य होतील. देशी भाषांच्या माध्यमांच्या शाळांच्या गुणवत्तेत एकदम भरीव वाढ झाली आणि या भाषांतील साहित्य समृद्ध झाले, तरच याला आळा घालता येईल. पण इंग्रजी भाषेचा चढता जागतिक आलेख पाहता असे होण्याची शक्यता दिसत नाही.

आपण जणू सैतानाशीच करार करून बसलो आहोत. आजच्या जागतिक बनलेल्या समाजात इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वातून आपल्याला स्पर्धात्मक फायदा मिळतो; पण आपली मातृभाषा गमावण्याने आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ऱ्हास होतो, हे मान्य करावेच लागेल. कारण भाषा हे केवळ संज्ञापनाचे साधन नव्हे; तर तो नवीन कल्पनांचा आणि भावनांचा स्रोत असतो. भाषेशिवाय आपल्याला विचार करता येणार नाही, हे आपल्याला समजते; पण तेवढेच नाही, तर तिच्यावाचून आपल्या जाणिवाही संकुचित होतील, हे आपण विसरतो. पंजाबी भाषा बोलताना मला विशिष्ट भावनेचा अनुभव घेता येतो, तो इंग्रजी बोलताना घेता येत नाही. माझी नेहमीच अशी इच्छा असते की, पंजाबीत लिहिता यावे; म्हणजे मग नवीन भावनांचे सारे पैलू नीट व्यक्त करता येतील.

आपण कुठल्या दिशेला चाललो आहोत, हे समजणे कठीण आहे. पण एक स्पष्ट आहे की, अधिकाधिक भारतीय इंग्रजी बोलत आहेत, लिहीत आहेत आणि शिवाय त्यांचे लिखाण प्रकाशित होत आहे. त्यांच्या लिखाणाला भारतीय आणि परदेशी बाजारपेठही मिळत आहे. १९८१ मध्ये सलमान रश्दींची 'मिडनाइट चिल्ड्रेन' प्रकाशित झाल्यापासून भारतीयांचे इंग्रजी साहित्य ठळकपणे नजरेत भरत आहे. एवढेच नव्हे; तर त्याला आदरही मिळू लागला आहे. पूर्वी भारतीयांना आपले देशबांधव कितपत इंग्रजी लिहू शकतात, याविषयी साशंकता होती. त्यांचा असा दावा होता की, माणूस आपल्या मातृभाषेतच साहित्य-निर्मिती करू शकतो. पण ते या गोष्टींची दखल घ्यायला विसरले की, अनेक भारतीयांची इंग्रजी ही मातृभाषा बनू लागली होती.

■

**मूळ इंग्रजी लेख** : Inescapably English

**संदर्भ** : Times of India, 18-10-2001.

**लेखकाचा पत्ता : पोस्ट बॉक्स - ३०४६, नवी दिल्ली - ११० ००३.**

**अनुवादक : सुप्रिया सहस्रबुद्धे**

**अनुवादकाचा पत्ता : १०३, विक्रम हाईट्स, कोथरूड, पुणे - ४११ ०३८.**



अनुक्रमणिका







**पुस्तक परीक्षण**

# शैलीमीमांसा : भाषा व संस्कृतीचे सौंदर्यविज्ञान

**एकनाथ पगार**

*(पुस्तक - शैलीमीमांसा (सिद्धान्त आणि उपयोजन), लेखक - डॉ. दिलीप धोंडगे, प्रकाशक - सुमती लांडे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २००१, पृष्ठसंख्या - १८२, मूल्य - १५० रु.)*

'शैलीमीमांसा' (सिद्धान्त आणि उपयोजन) हा डॉ. दिलीप धोंडगे यांचा ग्रंथ अलीकडेच प्रकाशित झाला आहे. शैलीविज्ञान, भाषाविज्ञान, सौंदर्यशास्त्र व समीक्षाविचार या अभ्यासशाखांना समन्वित करणारा हा अभ्यासग्रंथ आहे. आजवर शैलीविचार मराठीत जो काही झाला आहे, त्याच्या विकसनाच्या दिशा डॉ. धोंडगे यांनी या ग्रंथातून दाखविल्या आहेत. येथे 'शैली' या संकल्पनेचा शिस्तशीर परिचय करून देत शैलीलक्ष्यी अभ्यासाची सैद्धांतिक व उपयोजित बाजू सुस्पष्टपणे मांडली आहे. 'शैलीमीमांसा : चिकित्सक परिदर्शन' या पहिल्याच बीजलेखात 'शैली'ची सांकल्पनिक पातळीवरील चिकित्सा तपासली गेली आहे. अशा सखोल चिकित्सेतून सिद्धांतन करीत शैलीविचाराला उपयोजनाचे पाठबळ लाभले आहे. या ग्रंथाच्या निर्मितीमधून डॉ. दिलीप धोंडगे यांनी शैलीवैज्ञानिक अभ्यासाचे एक दिशादर्शक प्रारूप सिद्ध केले आहे. म्हणूनच 'शैलीमीमांसा' या ग्रंथाचा परिचय करून घेणे आवश्यक ठरते.

सध्याच्या काळात मराठीत समीक्षाविचार व साहित्यसिद्धांतन हे परभृत झाल्याचे दिसत आहे. एक प्रकारे मराठी समीक्षाव्यवहार युरोपीय सिद्धांतांच्या स्पष्टीकरणासाठी राबत असल्याचे चित्र निर्माण झाले आहे. अशा समीक्षाव्यवहाराद्वारे युरोपीय मीमांसकांच्या साहित्यविषयक विचारांचा प्राथमिक परिचय घडतो, नवे पारिभाषिक शब्द घडविले जातात; परंतु भारतीय जीवनसरणींशी वा साहित्याशी अशा साहित्यविचारांचा संबंध दाखविला जात नाही. जागतिक स्तरावरील साहित्यविचारांचे स्वरूप कळते; पण भारतीय साहित्याच्या आकलनात किंवा मूल्यनात काही भर पडताना दिसत नाही. हा सामान्यज्ञान-

प्रसाराचा प्रयोग सर्वसामान्य मराठी अभ्यासकांना घाबरवून टाकण्यासाठी चालला आहे, असा समज त्यामुळे पसरला आहे. शिवाय वर्तमान मराठी समीक्षाव्यवहार व साहित्यविचार केवळ वर्तमानपत्रे आणि ललितस्वरूपाचे दिवाळी अंक यांच्या हवाली केल्याने सुविहित अभ्यासाचे पद्धतशीर अवमूल्यन चालले आहे. या पार्श्वभूमीवर 'शैलीमीमांसा' या अभ्यासाचे महत्त्व लक्षात येते. डॉ. धोंडगे यांनी शैलीची तटस्थपणे बृहद्‌चिकित्सा केली आहे, त्यामुळे या संकल्पनेबाबतची संदिग्धता कमी झाली आहे. नेमके व संयमित विचारप्रकटीकरण उपयोजनाच्या पातळीवर पोहचविले असल्याने हा ग्रंथ मराठी समीक्षाविचारात मौलिक भर घालतो.

प्रारंभीच डॉ. धोंडगे यांनी सॅम्यूएल आर. लेविन, मुकार्झोव्हस्की, डेव्हिड बर्च, रोमान याकोबसन, जोनॅथन कुलर, एम्. ए. के. हॅलिडे, जे. सिंक्लेअर, जॉफरी लीच, जे. पी. थॉर्न, मायकेल रिफाटेरे, रोला बार्त आदी मीमांसकांच्या विचारांची पाहणी करीत 'शैली' या संकल्पनेची सूत्रबद्ध चिकित्सा केली आहे. या तऱ्हेच्या मांडणीमधून 'शैली'च्या ऐतिहासिक व क्षेत्रीय वाटचालीचा आराखडा सिद्ध झाला आहे; म्हणून एखाद्या संकल्पनेचे आकलन, उपयोजन व विकसन कसे बदलत जाते, हेदेखील कळते, साहित्यविचारातील गतिमानताही परिचित होते; शास्त्रीय वैचारिकतेमागील तर्कबद्धता व शिस्त जाणवते. 'शैली' या संकल्पनेचे यथार्थ आकलन होण्यासाठी या सर्वच विवेचनाची मोठी मदत झाली आहे. ही मीमांसा एक प्रकारे 'समीक्षेची समीक्षा' ठरते.

'हा काय म्हणतो? - तो काय म्हणतो?' या छापाचा समीक्षाव्यवहार व संशोधनव्यवहार अव्हेरून येथे शैलीची मीमांसा केली आहे. या मीमांसेत आपल्याकडील साहित्याचा वापर झाला आहे. मराठी साहित्यातील परिचित उदाहरणे दिल्यामुळे मराठी लेखनातील सौंदर्य व औचित्य लक्षात येते. उदाहरणादाखल पुढील निरीक्षण पाहू - "जेव्हा संदेश संपर्कावर केंद्रित होतो, तेव्हा भाषा ध्यानाकर्षण किंवा सावधान करण्याचे काम करते. उदा. 'आलं का लक्षात?' असे म्हणताना उत्तराची मुळीच अपेक्षा नसते; फक्त संपर्क अखंड आहे की नाही? हे एक प्रकारे तपासून घेतले जाते... हरिभाऊ आपट्यांचे 'वाचक हो' हे उद्‌गार इ. शब्दप्रयोगांचा यामध्ये विचार करता येऊ शकतो." अशा स्पष्टीकरणामुळे 'वाचक हो' ही हाक यथोचित वाटते. हरिभाऊ आपल्या कादंबऱ्यांमध्ये निवेदनात प्रत्यक्ष उपस्थित होतात, हाका मारल्याने निवेदन खंडित होऊन रसविघ्न निर्माण होते, वगैरे आक्षेप बाद ठरतात. 'वाचक हो' या हाकेमागील ध्यानाकर्षणाचे तत्त्व

लक्षात घेतले की कादंबरीतील निवेदक, निवेदन, संबोधन या संबंधीचे आपले पूर्वावलोकन नवे बनते. या हाकेचे हे स्पष्टीकरण योग्य होच. मराठी साहित्यातील अशा उदाहरणांमुळे येथील शास्त्रीय मीमांसा सुगम होऊन जाते. काव्यातील नवशब्दरूपांचा अवतार हा अनपेक्षित, असांकेतिक व एकमेवाद्वितीय परिणाम साधण्यासाठी असतो, हा मुकार्झोव्हस्कीचा विचार स्पष्ट करण्यासाठी डॉ. धोंडगे तुकारामाचा 'बरे जाले देवा निघाले दिवाळे । बरी या दुष्काळे पीडा केली ।' हा अभंग निरूपणासाठी घेतात. या निरूपणातून अभंगाचे शैलीच्या दृष्टीने रूपसौंदर्य व अर्थसौंदर्य (जे अभिन्न मानले जाते) दाखवून देतात. 'बरे जाले'च्या आवृत्तीमुळे नादसौंदर्य आणि अर्थसौंदर्य तर प्रकटतेच; शिवाय 'बरे जाले'ला 'बरे गेले', 'बरी ही दुर्दशा', 'बरा आलो', 'बरे व्रत' हे शब्दबंध समांतरतेने येतात. आवृत्ती व समांतरन्यास या तत्त्वांमुळे सौंदर्यसर्जन घडून येते. 'बरे जाले' या शब्दबंधाचे पुरोभूमीकरण घडते. अशा स्पष्टीकरणामुळे पुरोभूमीकरण हे शैलीतत्त्व सहजगम्य होते. मुकार्झोव्हस्की, रोला बार्त व रोमान याकोबसन यांच्या शैलीविचारांचा ठसा डॉ. धोंडगे यांनी स्वीकारल्याचेही जाणवते.

प्रारंभीच्या प्रकरणातून 'शैली' या संकल्पनेचा सैद्धान्तिकव्यूह सिद्ध करून पुढील भागात सिद्धान्ताचे उपयोजन केले आहे. उपयोजनासाठी कविता, कथा व कादंबरी या साहित्यप्रकारांच्या शैलीची सोदाहरण चिकित्सा केली आहे. शैलीची सूत्रे सांगून नंतर ती स्पष्ट करण्यासाठी उदाहरणे दिली आहेत, अशी उपयोजन विभागाची पद्धतशीर मांडणी केली आहे. कुसुमाग्रज (आम्ही दोघे), कांत (बुरशी), अरुण कोलटकर (श्री ज्ञानेश्वर समाधीवर्णन), पुरुषोत्तम पाटील (तळहात), बहिणाबाई चौधरी (कविता), तुकारामाचे अभंग, ज्ञानेश्वर (ज्ञानेश्वरी अध्याय १२) यांच्या निर्मितीतील शैलीतत्त्वे उपयोजनातून दाखविली आहेत. यामुळे आपोआपच ज्ञानेश्वर ते अरुण कोलटकर अशी आठशे वर्षांतील मराठी कविता शैलीच्या अंगाने तपासली जाते; कवितेचा शैलीलक्ष्यी प्रवासही अधोरेखित होतो. कविता या साहित्यप्रकाराच्या सौंदर्यनिर्माणक स्थळांचा परिचयही येथे झाला आहे.

शैलीविज्ञान ही स्वतंत्र ज्ञानशाखा असून भाषाविज्ञानाच्या मर्मदृष्टीचा आधार या शाखेत घ्यावा लागतो, अशी वस्तुस्थितीही शैलीमीमांसेत गृहीत धरली आहे. शैलीविज्ञान हे वस्तुनिष्ठतेचा आग्रह धरणाऱ्या भाषाविज्ञानावर आधारलेले विज्ञान आहे, ही जाणीव येथे तीव्रतेने प्रकटते. शिवाय भाषा हे कलाकृतीचे दुय्यम द्रव्यमाध्यम आहे, हे गृहितक स्वीकारून डॉ. धोंडगे भूमिका घेतात की -

"कलाकृतींतील लालित्य हे अनुभवाला सार्थ करणाऱ्या भाषेच्या लवचिक व बहुपरिणामी वापरातून अवतरत असते. भाषेच्या ह्या लवचिक व बहुपरिणामी होण्याच्या व्यापारात रचनापासून ते वाक्यघटकापर्यंतचे घटक सहभागी होतात. या घटकांच्या सरळरेषीय, उभ्या क्रमाच्या रचनेतून ते नियमोल्लंघन, विरूपीकरण, नव्यरूपीकरण इ. क्रियेतून लालित्य जन्मत असते. ह्या घटकांच्या विशिष्ट परस्पर-संपर्कातून उपमा, रूपक, उत्प्रेक्षादी अलंकार येतात व ते लालित्याची द्वारका तोलून धरण्याचा प्रयत्न करतात. या साऱ्यांना आपण शैलीगत घटक म्हणतो." येथे साहित्यसौंदर्य, लालित्य या संबंधीची वस्तुनिष्ठ भूमिका घेतल्याने शैलीमीमांसा ही एक प्रकारे लालित्याची शोधयात्रा ठरते. ध्वनी, शब्द, वाक्य व अर्थ या भाषाभ्यासाच्या घटकांच्या पाहणीतून लालित्यनिर्मितीच्या स्रोतांचा येथे शोध घेतला आहे. साहित्यकृतीचे 'साहित्यपण' हे साहित्यकृतीतील लालित्यघटकांवर कसे अवलंबून असते, याची चिकित्सा विश्लेषणांमधून झाली आहे. शैलीलक्ष्यी अभ्यासात 'हे चांगले - ते चांगले' अशी 'सब का भला' मानणारी भूमिका अस्वीकृत केली जाते. त्यामुळे 'मला भावले, मला वाटले - पटले - आवडले' अशी आस्वादात्मक किंवा परिणामशोषक प्रतिक्रियावादी भूमिका बाजूला पडते. साहित्याचे साहित्यपण वस्तुनिष्ठतेने दर्शविण्याची कामगिरी शैलीमीमांसा करते. साहित्यकृतीमधील सौंदर्य किंवा सौंदर्यविहीनता शास्त्रीय प्रमाणकांद्वारे सिद्ध झाल्याने साहित्यकृतीच्या बाहेर जावे लागत नाही, किंवा लेखकाच्या खाजगी जीवनाचा धांडोळाही घ्यावा लागत नाही किंवा अशा अभ्यासपद्धतीचा मुख्य फायदा म्हणजे शेरेबाजीला किंवा समीक्षकाच्या भावुक हालचालींना आळा घातला जातो. बाह्य विचारप्रणाली (मार्क्सवाद - गांधीवाद - अस्तित्ववाद), बाह्यसंदर्भ (युग, सामाजिक घटना, लेखक व त्याची निर्मितीच्या वेळची स्थिती) किंवा समीक्षकाची व्यक्तिगत मानसिक उलघाल यांना विरागी व्हावे लागते. शैलीमीमांसेतून साहित्यकृतीचे स्वयंसिद्ध सौंदर्यरूप समोर येते. म्हणून शैलीमीमांसा साहित्याच्या अभ्यासाची शास्त्रीय पद्धती ठरते. साहित्यकृतीची सौंदर्यात्म वीण उलगडत नेल्याने साहित्यकृतीच्या अंतःसत्त्वापर्यंतचा आनंददायी प्रवास घडून येतो. ध्वनीरूप ते समग्रसंहिता असा पट विश्लेषित व संश्लेषित होतो. 'बुरशी', 'श्रीज्ञानेश्वरसमाधिवर्णन' व तुकारामाच्या अभंगांचे शैलीविज्ञानात्मक विश्लेषण आदी विश्लेषणे मुळातून समजावून घेणे आवश्यक ठरते. या विश्लेषणांमधील तथ्ये प्रत्यक्ष साहित्यकृतींतील पुराव्यांवर आधारलेली आहेत. 'आकलन → विश्लेषण → सिद्धांतन' अशा प्रक्रियांमधून या उपयोजनपर

लेखनाची निर्मिती झाली आहे.

साहित्यकृती ही एक मुक्त संहिता मानून तिच्या सौंदर्यपूर्णतेचा प्रत्यय शैलीमीमांसेतून मिळतो. येथे साहित्यकृतीसंबंधींची निश्चित, साधार व वस्तुनिष्ठ निरीक्षणे डॉ. धोंडगे यांनी नोंदविलेली आहेत. उदाहरणादाखल तुकारामाच्या अभंगांसंबंधीचे पुढील निरीक्षण पाहू - "नादमयतेचा परिणाम तुकाराम शब्दांच्या वैशिष्ट्यपूर्ण पुनरावृत्तीनेही साधताना दिसतात..... इतरत्रही पुनरावृत्ती करतात. ती कधी रूपबंधाचीही करतात; तर कधी सबंध वाक्याची करतात. त्या वेळी या पुनरावृत्तीचा संबंध त्यांच्या मनाच्या आर्ततेशी, प्रामाणिक मानसिक तळमळींशी वा सच्छीलतेशी असतो. याशिवाय तुकारामांना एखादा मुद्दा ठसवायचा असतो, अशा वेळी ते विविध उदाहरणांची उतरंड रचूनच समजावून देतात." किंवा पुढील निरीक्षण पाहू - "तुंकोबांच्या शब्दांचे जाणवणारे एक सुस्पष्ट वैशिष्ट्य म्हणजे त्यांचा ठसठशीतपणा. हा ठसठशीतपणा त्या शब्दांच्या अविकृतपणामुळे बराच आहे. तुकोबांनी शब्दांचा वापर संवादासाठीच प्रायः केलेला असल्यामुळे आणि नेमका शब्द वापरल्यामुळे 'निवड' हा शैलीचा गुण आपोआपच पाळला गेला आहे. या साधेपणामुळे नाद, लय ही सहजच साधली गेलेली आपणांस दिसतात." प्रत्यक्षगत पाहणीतून असे निष्कर्ष येथे नोंदविलेले आहेत. या अभ्यासातून साहित्यविचारात, समीक्षेत शास्त्रीय वस्तुनिष्ठता येऊ शकते. भावुकतेपेक्षा भावाभिव्यक्तीच्या सुप्त सौंदर्यवाटा दाखविल्या जातात. 'एखादी संहिता सुंदर का ठरते?' या प्रश्नाचा वेध घेताना व्यक्तिनिष्ठ जाणिवा अव्हेरून संहितेतील सौंदर्यरूपांचा वेध घेतला आहे. 'शैली म्हणजे आशयावरील वेष्टन' ही एकांगी भूमिका नाकारून साहित्याचे आंतरिक शैलीलक्ष्यी घटक परस्परांशी कोणत्या नात्यांनी संलग्नित व कार्यकर आहेत, हे डॉ. धोंडगे दाखवितात. शैलीमीमांसा आग्रही होत नाही किंवा तार्किक प्रमादही करीत नाही, हे येथे विशेषत्वाने दिसते. आशय व रूप अशी द्वैती मांडणीही येथे नाही; एकत्रितच सौंदर्यशोधन घडते. साहित्याची समग्र संहिता अर्थवत्ता कशी प्रकट करते आहे? - याचे भान या विश्लेषणांमधून जागे होते. साहित्यातील शैलीगत घटक निश्चित करून त्या घटकांचे परस्परांशी असलेले नाते, त्यांची मांडणीमागील कारणे, त्या घटकांचा परस्पर होणारा परिणाम व अंतिमतः प्रकट होणारे लालित्य शैलीवैज्ञानिक विश्लेषणांमधून दिसते. साहित्याच्या संदर्भात भाषणबाजी, चमकदार शेरेबाजी करण्याऐवजी शैलीगत घटकांना चिंतनात्मक पवित्र्याने येथे शोधलेले दिसते.

येथे ध्वनी, ध्वनींच्या जुळणीतून आकारित शब्द, शब्दांच्या जुळणीने निर्माण होणारे शब्दबंध, शब्दबंधांच्या जुळणीतून सिद्ध होणारे वाक्य अशा क्रमाने संहितांचे विश्लेषण केले आहे. या अभ्यासाला वर्णनात्मक भाषाविज्ञानाचा आधार असल्याचेही दिसते. आशय व अभिव्यक्ती यांच्यातील ऐक्यसंबंध डॉ. धोंडगे यांना मान्य दिसतात; म्हणूनच साहित्यकृतींच्या सेंद्रिय रचनेमागील लालित्यघटकांचा प्रत्यय या विश्लेषणांमधून येतो. भाषाभ्यासाची अंगे विश्लेषणात सुटी-सुटी वाटत असली, तरी भाषा माध्यम म्हणून एकात्मरीत्या सौंदर्यपूर्ण कार्य करीत असते, या सूत्राचाही स्वीकार येथील विश्लेषणांमधून झाला आहे. साहित्यसंहितेचे निर्वहन भाषेद्वारे होते व तिच्या विविध घटकांच्या जुळणीमागील सूत्रे शैलीमीमांसा पुरवते. या प्रकारच्या विश्लेषणांसाठी निकटवाचन महत्त्वाचे असते. डॉ. धोंडगे यांच्या निकट व सूक्ष्मवाचनाचे सामर्थ्यही येथे जाणवते. उदाहरणार्थ पुढील विश्लेषण पाहू -

"माय म्हनता म्हनता
होठ होठालागे भिडे

यात स्वच्छपणे उच्चारणप्रक्रियेचे वर्णन प्रतीत होते.

आत्या म्हनता म्हनता
केवढं अंतर पडे (बहिणाबाई चौधरी)

ही ओवी वरील ओळींशी उच्चारणप्रक्रियेचे वर्णन म्हणून संलग्न आहे. 'माय' आणि 'आत्या' या दोन नातेसंबंधित शब्दांचे उच्चारण कसे निराळे आहे, हे 'होठ होठालागे भिडे' व 'केवढं अंतर पडे' या चरणांतून कळते. त्यात मग 'माय'मधील 'म' व आत्यामधील 'आ' हे स्वनिम उच्चारणदृष्ट्या महत्त्वाचे आहेत. 'म' हा व्यंजनस्वनिम; तर 'आ' हा स्वरस्वनिम. 'म'चे उच्चारण द्विओष्ठ्य; तर 'आ'चे उच्चारण अवृत्ताकार म्हणजे ओठ अलग होऊन उच्चारण. ह्या विरोधी उच्चारणाचे दोन अलग नातेसंबंधितच केवळ स्पष्ट होत नाहीत; तर त्यांच्या संबंधित व्यक्तींशी असलेला भावसंबंधही स्पष्ट होतो" - अशा विश्लेषणांमधून सांस्कृतिक भाषावैज्ञानिक आकलनक्षमता प्रकटते. म्हणून शैलीमीमांसा केवळ तांत्रिक ज्ञान ठरण्याऐवजी भाषा व संस्कृतीचे सौंदर्यविज्ञान ठरते!

या ग्रंथाच्या दुसऱ्या भागात कथा, कादंबरी या साहित्यप्रकारांच्या संदर्भात शैलीमीमांसा उपयोजित स्तरावर सादर केली आहे. 'तुकारामांच्या अभंगवाणीतील कथांची मीमांसा' हा एक वैशिष्ट्यपूर्ण लेख येथे आहे. गद्यसाहित्याच्या सौंदर्यशोधनासाठी कथनमीमांसेचे उपयोजन झाल्याचे सामान्यतः दिसते. मात्र

डॉ. धोंडगे यांनी अभंग या काव्यरचना प्रकारातही कथनमीमांसेचे उपयोजन करून आपली नवी मर्मदृष्टी प्रकट केली आहे. शिवाय येथे अण्णाभाऊ साठे व मनोहर शहाणे यांच्या कथनपर साहित्याचा शैलीदृष्ट्या परामर्श घेतला आहे. अण्णाभाऊंच्या भाषा उपयोजनासंबंधीची सूत्रे शोधताना डॉ. धोंडगे म्हणतात की, "हात व भाषा या दोन साधनांमुळे माणसाची मातब्बरी निर्विवादपणे स्पष्ट झाली. अण्णाभाऊंनी या दोन साधनांचे श्रेष्ठत्वच पटवून देण्याचे कार्य आयुष्यभर केले. पहिल्या साधनाचे श्रेष्ठत्व चळवळीतून व दुसऱ्याचे कलाकृती निर्मून त्यांनी स्पष्ट केले. अण्णाभाऊंना जागृती करायची होती म्हणून भाषेचा साधन म्हणून वापर करणे स्वाभाविक; पण त्यांच्या प्रतिभेने या साधनाला सहजपणे माध्यमात पर्यवसित करून त्याच्या कृतींना कलेचा दर्जा प्राप्त करून दिला आहे....." पुढे याच लेखात भाषेचे साधनात्मक अंग माध्यमात रूपांतरित कसे होते, हे दाखविले आहे.

'संस्कृतीचे विधायक तत्त्व म्हणजे शैली' या तत्त्वाधारे मनोहर शहाणे यांच्या कादंबरी वाङ्मयाचा परामर्श घेतला आहे. वाङ्मयप्रकारानुसार शैलीघटकांचा विचार डॉ. धोंडगे यांना अभिप्रेत आहे. ते म्हणतात - "कादंबरी या कथात्म वाङ्मयाचा अवकाश मोठा असल्याने कादंबरीतील प्रत्येक घटक रूढार्थाने भाषिक पातळीवरून न तपासता तो संस्कृतीच्या पातळीवर तपासला गेला, तर संस्कृतीच्या आवरणाखाली जे तात्त्विक, राजकीय, सामाजिक, आर्थिक वगैरे जीवनमान जगले जाते, ते जगणे असेच का, याची प्रक्रिया कळायला मदत होते." सामान्यतः मराठीत दीर्घकथनपर गद्याच्या शैलीची मीमांसा क्षीण स्वरूपात उपलब्ध आहे. डॉ. धोंडगे यांनी दीर्घकथनपर गद्याच्या शैलीचा अभ्यास सूक्ष्मतेने केला आहे, सांस्कृतिक संदर्भात मनोहर शहाणे यांच्या कथनपर साहित्याची शैलीमीमांसा प्रथमच सिद्ध झाली आहे.

'शैलीमीमांसा' या ग्रंथातून डॉ. धोंडगे यांनी वाङ्मयीन शैलीघटकांचा सहसर्जक सांस्कृतिक व्यूह सिद्ध केला आहे. सूत्रबद्ध व उपयोजित शैलीविचार करणारा हा या क्षेत्रातील महत्त्वाचा ग्रंथ ठरणार आहे. भास्कर हांडे यांनी 'शैलीमीमांसा' ह्या अभ्यासशाखेस एका उत्तम मुखपृष्ठ चित्राची भेट दिली आहे. जीवन, भाषा व संस्कृती यांच्या शैलीची एक दिशा या मुखपृष्ठातून सूचित होते. वाङ्मय, भाषा व संस्कृती यांच्या अभ्यासकांना विचारप्रवृत्त करणारा ग्रंथ सिद्ध केल्याबद्दल डॉ. धोंडगे अभिनंदनास पात्र आहेत.

■

**विटेवाडी रस्ता, देवळा (नाशिक) ४२३ १०२**

## ‘अंक’लिपीत मराठी?

यंदापासून प्राथमिक शालेय प्रमाणपत्र परीक्षेत मराठी, गणित व बुद्धिमत्ता क्षमता या तीन विषयांमध्ये ‘सामाजिक शास्त्र’ (इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र) आणि ‘सामान्य विज्ञान’ या दोन नवीन विषयांची भर घालण्यात आली आहे. अशी भर घालताना मातृभाषा मराठीचे महत्त्व कमी करून शंभराऐवजी सत्तर गुणांचीच प्रश्नपत्रिका ठेवण्यात आली आहे. प्राथमिक शाळेत पहिलीपासून सुरू करण्यात आलेल्या इंग्रजी भाषेचे आक्रमण चालू असतानाच मराठीचे कमी केलेले हे महत्त्व मराठी भाषकांना निश्चित खटकणारे आहे. मराठी शाळेतील विद्यार्थ्यांची मराठी भाषेतील प्रगतीची आज काय दयनीय अवस्था आहे, हे मुख्यमंत्री विलासराव देशमुख यांनीच बोलून दाखविले आहे. ‘मराठी चौथीतील विद्यार्थ्याला आपले नावही मराठीत लिहिता येत नाही,’ अशी खंत त्यांनी जाहीररीत्या व्यक्त केली होती. ‘प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम १९८८’ या अभ्यासक्रमावर ही परीक्षा आधारलेली असेल, असे नवीन प्रमाणपत्र परीक्षेच्या निर्णयात नमूद केले आहे. या अभ्यासक्रमात मातृभाषा शिकविण्याची जी उद्दिष्टे दिली आहेत, त्यात क्रमांक ४ व क्रमांक ७ उद्दिष्टांना ‘योग्य अभिव्यक्ती’ आणि ‘आवश्यक ते लेखनकौशल्य’ विद्यार्थ्यांना यावे, असे म्हटले आहे. या उद्दिष्टांना धरून आतापर्यंतच्या शिष्यवृत्ती परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेत पहिले दोन (वीस गुणांचे) प्रश्न (चित्रवर्णन व मुद्यांवरून गोष्ट) घालण्यात येत असत. नवीन परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेत हे प्रश्न वगळण्यात येणार असून फक्त वस्तुनिष्ठ प्रश्न विचारले जाणार आहेत. त्या प्रश्नांचे स्वरूपही असे अपेक्षित आहे की, विद्यार्थ्यांनी प्रश्नांची उत्तरे फक्त अंकांनी (तेही इंग्रजी अंकांनी) लिहावयाची आहेत. याचा अर्थ शिष्यवृत्ती परीक्षेच्या पातळीवरील या परीक्षेत मराठी भाषक विद्यार्थ्यांच्या या उत्तरपत्रिकेत एकही शब्द न लिहिता केवळ ‘अंक’लिपीत ही उत्तरपत्रिका लिहावी लागणार आहे. प्रश्नपत्रिकेतील वस्तुनिष्ठतेच्या व संगणकद्वारा पत्रिका तपासणीच्या या तंत्राच्या आधीन होऊन आपण विद्यार्थ्यांच्या मराठी भाषा अभिव्यक्तीवर, लेखनावर केवढा मोठा आघात करीत आहोत, याचा विचार महाराष्ट्र शासनाने जरूर करावा. ■

(डॉ. प्र.ल. गावडे, ‘शिक्षणविचार’, पुणे वृत्तांत, ‘लोकसत्ता’, २३-७-०२, पृ. ५)



अनुक्रमणिका

# बुवा, आयडिया आणि एक्स्क्यूज

शरदिनी मोहिते

आमच्या ईशाच्या हुशारीचं सर्वांनाच मोठं कौतुक ....ती ज्युनियर के.जी.च्या वर्गात असतानाची गोष्ट. ईशाच्या हुशारीचं कौतुक तिच्या आईजवळ बोलून दाखवताना तिच्या बाईंच्या अंगावर रोमांच उभे राहिले होते. वर्गातल्या वीस मुलांपैकी एका गैरहजर मुलाचं नाव बाईंना काही केल्या आठवत नव्हतं. मदतनीस आर्जींनाही आठवत नव्हतं. मुलांनाही आठवत नव्हतं. सगळेच गप्प. आपापल्या विचारात. तेव्हा ईशा उच्च स्वरात म्हणाली, "तन्मय नाही ना आला!" तेव्हा सारेच जण थक्क झाले होते; आणि आपल्याला कसं आठवलं नाही, असा बावळट भावही त्यांच्या चेहऱ्यांवर प्रकटला होता.

ईशानं एकदा चक्क एक कविता केली! केली आणि उत्तम सुरात, चांगल्या एकाग्रतेनं रंगून जात, ताल धरत तिनं ती म्हणूनही दाखवली. ती कविता अशी -

आंबोळीच्या झाडाके लपलाय एक भुंग्या रे
चांदूमामाच्या अंगावर बसलाय एक बुवा रे ।

चंद्रावरच्या डोंगर-दऱ्यांना बहुतेकांनी ससा म्हटलेलं, काहींना हरणही आठवलेलं; पण हिनं एक 'बुवा' तिथं बसलेला पाहिलेला!

असंच एकदा रात्री पावणेअकराला तिनं मला फोन केला. म्हणाली, "मी, एक गोष्ट रचली आहे, ती तुला सांगते. ऐक -"

तिनं गोष्ट सांगितली -

"एक होता कोल्हा. त्याला बाहेर जायचं होतं. पण दाराला होतं कुलूप.. तेव्हा काय करायचं? तो विचारात पडला. तेवढ्यात त्याला एक आयडिया सुचली. आणि त्यानं दाराच्या वरूनच उडी मारली! आणि तो बाहेर आला आणि त्याला आनंद झाला. मग तो देवबाप्पाला म्हणाला, "थँक यू देवबाप्पा, थँक यू!"

गोष्ट सांगून झाल्यावर ती म्हणाली, "लगेच लिहून ठेव हं कागदावर; नाही तर मी विसरून जाईन. तू मला सांग ती उद्या.... आवडली ना गोष्ट?"



अनुक्रमणिका

मला गोष्ट आवडली होतीच. तिचं वय काय होतं तेव्हा? अवघं साडेचार वर्षांचं ते वय. स्वतः गोष्ट रचणं आणि ती ताबडतोब मला ऐकवणं, हीच गोष्ट अजब वाटली मला. पण त्या वेळेला मला जास्त आवडला तो कथनाचा ढंग; गोष्ट सांगतानाचा सच्चा आर्जवी सूर.... मधूनच ते उत्कंठावर्धक थांबणं. सगळंच अप्रतिम वाटलं... पण गोष्ट कागदावर उतरून झाल्यावर वाटलं, 'आयडिया' कशी आली यात? 'कल्पना' सुचलीच नसेल, का अवघड पडली असेल? आयडिया सहज उतरली, ही वेगळी विशेष गोष्ट नाही का?

शिवाय देवबाप्पा तर अस्सल मराठी! त्याला 'थँक यू' म्हणून घ्यायची सवय कधी लागली असेल काय?

अगदी सहज इंग्लिश शब्द या हल्लीच्या मुलांच्या तोंडी बसलेले असतात. अगदी अचानक एवढ्याशा मुलांच्या तोंडून सहजपणे उत्तम उच्चारांनिशी आलेल्या शब्दांमुळे आपल्यालाच कधी कधी गांगरायला होतं. 'थँक यू'. सर्रासच; पण 'एक्स्क्यूज मी' हा बोलायला, जीभ वळवायला आणि एकूणच तोंडाच्या हालचालीसाठी संस्कृत शब्दोच्चारांप्रमाणे बोलणाऱ्याची कसोटी पाहणारा अवघड शब्द सहज बोलून जातात ही मुलं. गंमत म्हणजे पुष्कळ वेळा त्यांना त्यांचा अर्थही माहीत असतो. परिस्थिती अशी की, या मुलांना किती तरी मराठी शब्दांच्या अर्थाच्या समजुतीसाठी इंग्लिश शब्द सांगावे लागतात!

एकदा याच्या उलट घडलेली, तीही सहजपणे, एक गंमत अशी की, आमची दुसरी एक नात शर्वरी आमच्या बरोबर फिरायला आली होती. वाटेत तिला आकर्षक रंगाचे सुंदर फुगे दिसले. तेव्हा तिनं ओरडायला सुरुवात केली, 'फुगा! फुगा!!' तिलाच काय, आम्हालाही त्या फुग्यांचं आकर्षण वाटलं होतं! तिला फुगा हवाच असणार, हे माहीत असूनही आम्ही तिला प्रतिसाद दिला नाही. कारण त्या अफाट गर्दीतून फुग्यासकट तिला सुरक्षित घरी नेता येईल, अशी तेव्हा खात्रीच वाटत नव्हती मनाला!

शर्वरीनं आणखी एकदोनदा प्रयत्न करून पाहिले. भर गर्दीतल्या भर वेगाच्या वाहनांच्या आवाजामुळे आम्हाला ऐकू आलं नसावं, अशी तिची समजूत झाली असावी. पुनः तिच्या डोक्यात विचार चमकला, यांना बहुधा आपण सांगितलेलं समजलं नसावं, यांना फुगा म्हणजे काय हे समजलं नसावं; म्हणून मग 'समजूतदार' चेहरा करून ती म्हणाली, 'बलून' 'बलून!!'

आपण मुलांबद्दल विचार करतो, तसा मुलंही आपल्याबद्दल विचार करतात,

याचा हा नमुना असंही सांगून जातो, की बिचाऱ्या आजीला मराठी येत नसावं, असा विचार नातीच्या मनात चमकून उठू शकतो!

■

ए१/४, शरयू सरिता नगरी, फेज २, सिंहगड रोड, पुणे ४११ ०३०.
टेलिफोन : ४२५१३५३

## इंग्रजीचे अजब नमुने!

......उपवर तरूणींना हमखास विचारला जाणारा प्रश्न म्हणजे 'एक्स्पेक्टेशन्स काय आहेत?' अपेक्षा हा शब्द अर्थाच्या दृष्टीने अजिबात कमी नाही. बरं, आकारानेही लहान आहे. हा साधा शब्द सोडून दोन जोडाक्षरे असलेला पाच अक्षरी अवजड शब्द आपण का वापरतो? सर्वात त्रस्त करणारा वाक्प्रचार म्हणजे 'वेट' करणे. हा शब्दप्रयोग ऐकला की माझे कान दुखायला लागतात. पहिली गोष्ट 'वेट' हे नाम नाही. त्याला करणे हे क्रियापद कसे लागेल? मला तर एकदा समजेना की 'वेट' करणे म्हणजे 'वजन करणे' की 'ओले' करणे? असेच बोलणे चालू राहिले तर एके दिवशी 'रिड करणे', 'सिंग करणे' असे शब्द रूढ होतील अशी भीती वाटते. कारण असली भाषा 'एन्जॉय' करणे चालूच आहे. ट्रीप या शब्दाला सहल शब्द काय वाईट आहे? 'ट्रॅव्हल' अपरिहाय आहे का? प्रवास हा शब्द कितीतरी सुटसुटीत आणि अर्थपूर्ण आहे. फुलांना साजेसा फुलदाणी हा नाजूक शब्द डावलून मराठीच्या माथी आपण अवजड 'फ्लॉवरपॉट' का मारतो आहोत? 'अलार्म' मधला सर्वच्या सर्व अर्थ 'गजर' मध्ये येतो. मोठा आवाज येतो, सावध करणे येते, मग 'अलार्म' टाळायला काय हरकत आहे? मिटिंग ऐवजी सभा का भरवू नये? फी ऐवजी त्या त्या ठिकाणी शुल्क किंवा वर्गणी का भरू नये? 'अपॉईटमेंट'पेक्षा नियुक्ती शब्द सोपा आहे. 'एन्व्हलप'पेक्षा पाकीट सोयीचे आहे. 'ब्रेकफास्ट'पेक्षा न्हायरी बरी. 'क्यू'पेक्षा रांगेत राहणे चांगले ...

........मराठीत इंग्रजी शब्द वापरल्याने आपल्या बोलण्याची प्रतिष्ठा वाढते, हा वसाहतवादी भ्रम आहे. सिंदबादच्या पाठुंगळीवरच्या म्हाताऱ्यासारखे हे भ्रम आपल्या राशीला लागलेले आहेत. ते जितक्या लवकर टळतील तितके बरे.........

■

**(सुप्रिया सहस्रबुद्धे - 'आपण हे शब्द मराठीत वापरतो का?', 'स्त्री' : फेब्रु. २००२, पृ. ६१)**

# ‘ऋतुचक्र’मधील भाषाशैलीचे वेगळेपण

शकुंतला क्षीरसागर

सुमारे पन्नास वर्षांपूर्वी प्रकाशित झालेल्या, निसर्गवर्णनपर ललित निबंधांचा समावेश असलेल्या ‘ऋतुचक्र’ या पुस्तकातील अनोख्या निसर्गदर्शनाने अनेक रसिक वाचक आणि समीक्षकही स्तिमित झाले होते. आपल्या भोवताली असणाऱ्या कावळे, कबुतरे, मांजरे, फुलपाखरे इत्यादी प्राणि-पक्षी आणि कीटकसृष्टीचे, तसेच वड, पिंपळ, शिरीष, कडुनिंब, गुलमोहर इत्यादी वृक्षांचे, मधुमालतीसारख्या वेलींचे, चंद्र-सूर्य यासारख्या ग्रहगोलांच्या आणि ध्रुवासारख्या ताऱ्यांच्या भ्रमणाचे, ढगांच्या रंगरूपाचे आणि आकारांचे, तेरडा, गुलबाशी, खुरचाफा, देशी बहावा यासारख्या फुलांच्या बहराचे, वेगवेगळ्या वेळी चमकणाऱ्या समुद्राच्या रंगांचे, लाटांचे हे वर्णन वाचल्यावर रसिक वाचक फार प्रभावित झाले होते. आजही या पुस्तकाची लोकप्रियता टिकून आहे. त्याचे श्रेय दुर्गाबाईंच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीकडे जितके जाते, तितकेच ते त्यांनी त्यात योजलेल्या भाषाशैलीकडेही जाते.

त्यांच्या भाषाशैलीची वैशिष्ट्ये नोंदविताना “अनेकदा त्यांच्या वाक्यांना क्रियापदे नसतात. त्याऐंवजी वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणे त्या वापरतात किंवा संस्कृतसारखी कर्मणी भूतकालवाचक विशेषणे वापरून आपली वाक्यरचना करतात,”[१] यांचे उल्लेख मीना वैशंपायन यांनी केले आहेत. लहानलहान वाक्ये, जलद लय, नाजूक शब्दकळा, नादमय परिणाम यांचाही निर्देश त्यांनी केला आहे. हे उल्लेख व निर्देश मीना वैशंपायन यांची प्रगल्भ जाण दर्शवितात. परंतु मला जाणवलेल्या वैशिष्ट्याचा पुसटसा उल्लेखही त्यांनी केलेला आढळला नाही; म्हणून या लेखामध्ये मला जाणवलेल्या वैशिष्ट्याची सविस्तर सोदाहरण नोंद करावी, एवढा मर्यादित उद्देश समोर ठेवला आहे. या लेखातील उदाहरणांसाठी दुर्गाबाई भागवत यांच्या ‘ऋतुचक्र’ या पुस्तकाच्या, मुंबई येथील पॉप्युलर प्रकाशन या संस्थेने जुलै १९७३ मध्ये प्रकाशित केलेल्या चौथ्या आवृत्तीचा उपयोग केला आहे.

आपल्याला व्यक्त करायचा आशय अधिक प्रभावी व्हावा यासाठी लेखक



अनुक्रमणिका

अनेकदा द्विरुक्तीचा वापर करतात. अतिशयता, पृथकता, संथपणा, लगबग, त्वरा, पौनःपुन्य इत्यादी अर्थच्छटा द्विरुक्तीमधून व्यक्त होतात. दुर्गाबाईंनी द्विरुक्तीची योजना 'ऋतुचक्रा'मध्ये फार समर्थपणे केली आहे, असे आढळते. नामे, विशेषणे, क्रिया-विशेषणे यांची द्विरूक्ती करून दुर्गाबाईंनी ऋतुचक्रातल्या बदलाचे वर्णन प्रत्ययकारी केले आहे. पुस्तकात पानोपानी आढळणाऱ्या द्विरुक्तीचे प्रतिपादन मोजक्या उदाहरणांनी केले आहे.

**नाम :**

पृथकतेचा निर्देश करण्यासाठी नामांची पुनरुक्ती खालील वाक्यांमध्ये केलेली आहे.

(१) माधुर्याची प्रतीती मनामनाला होत असते (पृ. ६)

(२) आणि नुसती पालवीच नाही; तर हिरवी फळेही इतर झाडांप्रमाणे याच्या फांदीफांदीला ओळीने चिकटून बसली आहेत. (पृ. ७)

(३) झाडांवरची इतर पाने-फळे झुळकाझुळकांबरोबर नाचत असायची. (पृ. २०)

(४) मृगाचे टपोर पोटाचे किडे ढेकळाढेकळांतून फिरत असतील. (पृ. ३२)

(५) झाडांच्या पानापानांत आतुरता भरलेली दिसते. (पृ. ३४)

(६) हेमंतात चांदणीचांदणीचा रंग वेगळा वाटतो. (पृ. ६३)

अतिशयता व्यक्त करण्यासाठीही दुर्गाबाईंनी नामाच्या द्विरूक्तीचा प्रयोग केला आहे. उदाहरणार्थ -

(७) मुचकुंदाचा केसांना लागलेला सुगंध दिवसदिवस टिकतो.

**विशेषणे :**

विशेषणांची द्विरूक्ती अतिशयता दर्शविते. दुर्गाबाईंनी विशेषणांची द्विरुक्ती आशय अधिक ठसविण्यासाठी केली आहे. उदाहरणार्थ -

(८) समुद्राचा रंगही आता बदलला. नेहमीसारखा झाला आहे. निळानिळा. (पृ. ६९)

(९) पण त्यांच्यावरचे ते मधाने थबथबलेले, तांबड्या फुलांचे मोठे मोठे केसर असलेले सुंदर तुरे हारोहारी लागले आहेत. (पृ. ७)

(१०) त्यांच्या लांब लांब फांद्या तजेलदार गुलाबी फुलांनी बहरल्या आहेत. (पृ. २५)

(११) पांढरे पांढरे ते ढग रात्रीच एकाएकी जमा झाले. (पृ. २८)

(१२) उन्हाळ्यात ढग नसल्यामुळे आकाश उंच उंच जाते. (पृ. ५०)

(१३) पण आजूबाजूचे सारे हिरवे हिरवे पुष्पमंडित वनस्पतींचे जग पाहून श्रावणात दगडांनी शेवाळाच्या शाली पांघरल्या. (पृ. ७८)

(१४) मग ती पाकोळी मोठी मोठी होऊ लागली. (पृ. ४९)

(१५) ते मुके दृश्य किती किती बोलके होते म्हणून सांगू? (पृ. ९८)

**क्रियाविशेषणे :**

क्रियाविशेषणांच्या द्विरुक्तीमधून अतिशयता, वारंवारता, सातत्य, पृथकत्व, संथपणा इत्यादी अर्थ व्यक्त होतो.

क्रियाविशेषणांच्या उचित योजनेने दुर्गाबाईंना आपले प्रतिपादन उठावदार केले आहे.

**'त' प्रत्ययान्त कृदन्ते :**

(१६) बाकीची फुले पहाटे किंवा संध्याकाळी लाजत लाजत फुलतात, केव्हा फुलली ते कळतही नाही. (पृ. ५७)

(१७) नवी पालवी लागत लागत जुनी गळायची असे होत असते. (पृ. १०३)

(१८) जुनी पाने गळता गळता नवी येत होती. (पृ. ६)

(१९) आणि मग एकेक गुच्छ फुलता फुलता सबंध झाड फुललेले दिसते. (पृ. १०)

(२०) चित्तुर, टोळ हे प्राणी उडता उडता मीलन पावताना आपल्याला दिसतात. (पृ. १३)

**'ऊन' प्रत्ययान्त कृदन्त :**

(२१) तहानलेली झाडे वर उडता आले नाही, तरी उसळ्या मारमारून मेघांना झोंबू पाहतात. (पृ. ३४)

**स्थलदर्शक क्रियाविशेषणे :**

(२२) कुठे कुठे रातराणीचे फुललेले तुरे त्या चांदण्या रात्रींना सुगंधित करतात. कधी कुठे मोगरा, कुठे सायली. (पृ. १७)

(२३) पोपट आपला भोवती भोवती करीत होता. (पृ. ६८)

**श्रेणीवाचक क्रियाविशेषणे :**

(२४) आकाशदेखील उत्तरोत्तर ढगांनी अधिक व्यापून जाईल. मधूनमधून ऊन पडेल तेवढेच. (पृ. ३०)

**संख्यावाचक क्रियाविशेषण :**

(२५) दुसऱ्या वारुळातून एकएक मुंगी सावकाश येऊन त्यातले एकेक धड

कष्टाने वाहून नेत होती. (पृ. ११५)

**अनुकरणवाचक क्रियाविशेषणे :**

या प्रकारच्या शब्दांच्या योजनेने गती, वेग, अतिशयता, संथपणा, वारंवारता, पृथकत्व, सातत्य इत्यादी अर्थांचा बोध होतो. दुर्गाबाईंनी गतिदर्शक अनुकरणवाचक क्रियाविशेषणांचा उपयोग बाहुल्याने केला आहे. उदाहरणार्थ -

(२६) (फुलपाखरांनी) पंखांची उघडमीट चारपाच वेळा झपझप केली. (पृ. ४४)

(२७) झपाझप शेंग वाढीला लागते. (पृ. ३६)

(२८) झरझर पंख पसरून दोन-तीन फेऱ्या त्यांनी झाडाभोवती घातल्या. (पृ. ९७)

(२९) पाने टपटप गळताना दिसतात. (पृ. १८)

(३०) निळ्या आकाशाखाली निळे पाणी थयथय नाचत असते. (पृ. ३०)

(३१) बदाबदा त्यांची अंडी कोसळताहेत. (पृ. १३)

(३२) जुनी पाने भराभर गळत जातात. (पृ. १०३)

(३३) पाकोळ्या भिरीभिरी झाडाच्या माथ्यावर नाचताहेत. (पृ. ११४)

(३४) पिंपळाची सळसळ मंदावली. (पृ. ६४)

दुर्गाबाईंच्या चित्रदर्शी शैलीचे सौंदर्य या वेगवेगळ्या प्रकारांमधल्या द्विरुक्तीने द्विगुणित झाले आहे, यात शंका नाही.

**संदर्भ टीप :-** १. मीना वैशंपायन, दुर्गापर्व (मुंबई : डिंपल पब्लिकेशन, १९९६) १६९.

■

**२९/४१८ लोकमान्यनगर, पुणे ४११ ०३०. टेलिफोन नं. ४३३६२०८**

*(प्रसिद्ध लेखिका श्रीमती दुर्गा भागवत यांचे नुकतेच निधन झाले आहे. त्यांना 'श्रद्धांजली' म्हणून हा लेख मुद्दाम घेतला आहे. - संपादक)*

# स्त्रियांची पुंलिंगी व नपुंसकलिंगी नावे

मनोहर राईलकर

संस्कृतातून मराठीत शब्द घेताना काही प्रसंगी त्यांचे लिंग बदलले जाते, हे आपण जाणतोच. उदाहरणार्थ, समाधी, उपाधी, व्याधी, काच वगैरे मूळचे पुंलिंगी शब्द मराठीत मात्र स्त्रीलिंगी झाले आहेत. पण तरीही, आईवडिलांनी आपल्या मुलींची, नवऱ्यांनी आपल्या पत्नीची नावं पुंलिंगी किंवा नपुंसकलिंगी का निवडावीत? त्याच्या मागची मानसिक आणि / अथवा वाङ्मयीन प्रक्रिया काय (प्रश्नार्थी!) असेल?

सिंधू, इंदू, बिंदू (ही तिन्ही नावं गडकऱ्यांच्याच नाटकातली असावीत, हा एक मोठाच योगायोग!) अंजलि (ली) सविता, नीलिमा, गरिमा, महिमा, प्रेमा, मेधावी, रश्मी, निधी, शशी, किरण, हिरा, मधू, वेणू, रेणू, शकुंती हे शब्द पुंलिंगी आहेत. तरीही स्त्रियांना तशी नावं घेताना संकोच वाटत नाही. का?

सविता, नीलिमा, महिमा, हिरा ही नावं आकारांत आहेत म्हणून? मग चंद्रमा, लालिमा, रक्तिमा, राजा, यांचं काय? निधी, रश्मी, मेधावी ही ईकारांत आहेत, तर 'रवी'चं काय? अलीकडे मराठीत आलेला 'विकी' आहेच. हरी, काली, शकुंती आहेतच आणि शकुंती (पक्षी) हे नाव आपल्याला मुलाकरता चालेल का? (मुलीचं म्हणून हे नाव मी कुठं ऐकलं नाही. पण, मुलीकरता आणखी एक नाव सुचवल्याचं श्रेय तर मला मिळेल?)

गंमत अशी की, वरील सारे शब्द पुंलिंगी असले, तरी यातला 'किरण' सोडला, तर एकही शब्द मुलांच्या नावाकरता आपल्याला चालणार नाही. त्यातल्या त्यात मुलाला 'शशी' (शशिकांतचं लघुरूप म्हणून) आणि 'मधु' (मधुकरचं किंवा मधुसूदनचं लघुरूप म्हणून) वापरलेलं चालतं. तद्वतच काही जातींत आणि महाराष्ट्राच्या काही भागांत 'हिरा' हे नाव मुलांकरता वापरण्याची पद्धत आहे. ते अपवाद सोडले, तर 'हिरा आला' हे वाक्य आपल्याला चमत्कारिक वाटेल. पण 'ढेकणाच्या संगे हिरा जो भंगला' हे वाटणार नाही. अंजली आला, सविता

म्हणाला, नीलिमा जातो, मेधावी पाहतो, रश्मी पडला, निधी हसला, वगैरे वाक्प्रयोग व्याकरणदृष्ट्या (की लिंगदृष्ट्या?) बरोबर असले, तरी चुकीचे वाटतात.

पण, सहस्ररश्मी सविता प्रकाशला, आकाशाचा स्वच्छ नीलिमा मोठा प्रसन्न वाटला, हे चालतं. मुलाकरता 'प्रेमा' हे नाव चाललं नाही, तरी 'खरा तो प्रेमा ना धरी लोभ मनी' ह्या पदातला पुंलिंगी उल्लेख खटकत नाही. 'ही आमची मुलगी निधी' हे वाक्य आपल्याला चुकीचं वाटत नाही आणि त्याच वेळी 'मदतनिधी अमुक अमुक जमला' हेही चुकीचं वाटत नाही. 'वेणू घरी परतली' हेही योग्य वाटतं आणि 'कृष्णाचा मधुर वेणू' हेही चालतं.

भूमितीत 'बिंदू' पुंलिंगी चालतो, त्याच वेळी मुलींच्या नावाकरता स्त्रीलिंगी वापरताना खटकत नाही. (बिंदुमाधव नावाचं लघुरूप बिंदू होतं.) चंद्राकरता 'इंदू' चालत असला तरी मुलाच्या नावाकरता चालत नाही. सिंधुसागरात 'सिंधू' पुंलिंगी; पण म्हणून मुलांच्या नावाकरता कसा चालेल? फूल म्हणून तो गुलाब; पण मुलीचं नाव म्हणून ती गुलाब. विदर्भात गेलो असताना मी हे मुलांचंही नाव म्हणून ऐकलंय. आणि गुलाबराव नावाचे संत तर प्रसिद्धच आहेत.

दुसरा मुद्दा. संस्कृतात सर्वसाधारणपणं प्रथमा, द्वितीया आणि संबोधन या विभक्ती सोडल्या, तर नपुंसकलिंगी शब्द पुंलिंगी शब्दांप्रमाणंच चालतात. त्यामुळं स्त्रियांनी नपुंसकलिंगी नावं तरी का घ्यावीत, हा प्रश्नही ओघानंच येतो. कुसुम, कमल, रतन (रत्न), सरोज हे शब्द नपुंसकलिंगी असून स्त्रियांच्या नावाकरता चालतात. पुरुषांच्या नावाकरता मात्र चालत नाहीत.

तिसरा मुद्दा. काही शब्द-कोशकार अमराप्रमाणं अस्त्री (पुं. वा नपुं.) असूनही स्त्रियांना नावाकरता चालतात. 'कांचन' पुंलिंगी असताना त्याचा अर्थ 'धत्तुरा' किंवा 'चाफा' आणि नपुंसकलिंगी असताना सोने. पण ते मुलींचं नाव असतंच. (क्वचित ते मुलांचंही नाव असतं, हे मला माहीत आहे.) तेच 'कुमुद' याही शब्दाचं. पुंलिंगी असेल, तर लिली जातीचं फूल, किंवा विष्णूची (चा?) एक उपाधी, किंवा कापूर, किंवा माकडाची एक जात, किंवा एका नागाचं नाव (यानं आपली कुमुद्वती ही मुलगी लवाला दिली होती), किंवा नाव (होडी या अर्थी) इतके अर्थ आपटे-कोशात दिले आहेत आणि नपुंसकलिंगी असेल, तर त्याचा अर्थ चांदी. पुंलिंगी 'शिरीष'चा अर्थ झाड आणि नपुंसकलिंगी असता ह्याच झाडाचं फूल, असे अर्थ आपटे-कोशात आहेत. (शिरीष हे नाव मुलाचंही असतं.)

उलट मुलांचीही स्त्रीलिंगी नावं आढळली आहेत. पण शोध घेऊनही तशी फारशी सापडली नाहीत. कुणी सुचवली, तर माझ्या माहितीत भर पडेल. उदा. 'शरद' अर्थात ऋतू म्हणून पुंलिंगी असतो. खानदेशात 'वना' हे मुलाचं नाव मी ऐकलं आहे.

सहज मनात कल्पना आली आणि शोध घेता घेता इतका विस्तार झाला. ■

**'मृण्मयी', ५६ जेधे नगर, बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७**

**वसा आंतरभारतीचा**

## शब्दशिल्पी

काही लोक शब्दांच्या पायांत पैंजणे बांधतात,
आणि ते ठुमकत ठुमकत अंगणात खिदळू लागतात.
काही लोक शब्दांना बाहुल्यांसारखे सजवतात, नटवतात,
आणि ते रस्त्यांतून खेळायला लागतात.
काही लोक शब्दांना प्याद्यांप्रमाणे चालवू पाहतात,
आणि ते आपल्याच घरात मार खात जातात.
काही लोक शब्दांचा नाण्यांप्रमाणे उपयोग करताना दिसतात,
आणि स्वतःच विकले जातात.
काही लोक शब्दांना तलवारीप्रमाणे चालवतात,
आणि त्यामुळे त्यांचेच देह रक्तबंबाळ होत जातात.
काही लोक शब्द श्वासासारखे जगतात,
आणि त्यानेच समाजाचे शरीर विणले जात राहते.

**मूळ कवी : रामनारायण उपाध्याय**
**अनुवादक : विद्युल्लेखा अकलूजकर**
**५३४६, ओपल प्लेस, रिचमंड बी.सी., कॅनडा**

ज्याची त्याची प्रचीती

# शुद्धलेखनाचे मानसशास्त्र

द. भि. कुलकर्णी

'टाइम्स' हा शब्द सुटेपणाने लिहावयास सांगितला की अधिकांश व्यक्ती तो 'टाईम्स' असा लिहितात; 'महाराष्ट्र टाइम्स हे वृत्तपत्र.....' असा वाक्यात लिहावयास सांगितला, की 'टाइम्स' असाच लिहितात.

दुसरे उदाहरण : 'बोकील' या शब्दातील 'की' दीर्घ लिहितात व 'बोकिलांची कथा' इथे 'की' ऱ्हस्व (कि) करतात; पण 'गाडगीळ'चे 'गाडगिळांच्या कथा' असे रूप करीत नाहीत. हे अतज्ज्ञाच्याबाबतच घडते असे नाही; तर तज्ज्ञ लेखक-प्रकाशक-मुद्रकही असा घोटाळा करतात.

अशी आणखी बरीच उदाहरणे देता येतील.

यापेक्षाही गमतीदार उदाहरण 'कुळकर्णी' या शब्दाबाबतचे. पूर्वी मी माझ्या आडनावात 'ळ' कटाक्षाने वापरत होतो, तेव्हा मुद्रक-संपादक-प्रकाशक कटाक्षाने 'कुलकर्णी' असे छापत. शेवटी मी कंटाळून 'ल' वापरायला लागलो, तर अनेक छपाईवाले माझ्या आडनावात 'ळ' टाकायला लागले! अखेरीस त्रासून मी कै. सु.बा. कुलकर्णी यांना विचारले, "आपण 'ळ' लिहायचे की 'ल'?" तेव्हा ते भाषातज्ज्ञ म्हणाले, "आम्ही सीकेपी 'कुळकर्णी' असे लिहितो; तुम्ही देशस्थ 'कुलकर्णी' लिहिता." हा खुलासा ऐकून मला धक्का बसला हे सर्वत्र खरे असतेच असे नाही मात्र आपली जात / पोटशाखा कळू नये म्हणून मी आता आलटून - पालटून 'ल' आणि 'ळ' लिहित आहे.

आणखी वेगळ्या प्रकारची उदाहरणे सांगतो : 'पुनःस्थापना', 'निद्रित', 'विमुख' अशी शब्दरूपे माझ्या लेखनात आली की मुद्रितशोधक तातडीने 'पुनर्स्थापना', 'निद्रिस्त', 'विन्मुख' अशी चुकीची दुरुस्ती करतो. मराठीच्या प्राध्यापकाचे लेखन आपण शुद्ध करतोय, असा अभिमानही त्याला तेव्हा वाटत असेल!

माझ्या एका विद्यार्थ्याच्या लेखनात एकच शुद्धलेखनाची चूक असते : तो ऱ्हस्व इकार-उकार यांच्या जागी दीर्घ ईकार-ऊकार वापरतो - कितीही सांगितले, तरी त्याची ती खोड जात नाही. दुसरा एक विद्यार्थी याच्या अगदी उलट चूक करतो; म्हणजे तो नेमके दीर्घ ईकार-ऊकार ऱ्हस्व लिहितो. बाकी सगळे लेखन उत्तम. अनुस्वाराबद्दलही तेच : एक कुठेच अनुस्वार देत नाही; जसे, सन्यासी, इग्लड; दुसरा नेमका चुकीच्या अक्षरावर अनुस्वार देतो; जसे, मत्रं, अतं.

हा काय प्रकार आहे?

अज्ञान, अनवधान, आळस, बेफिकीरी, घाई-गडबड, स्वबोलीचा संस्कार, हिंदीचा परिणाम अशी काही कारणे असतात, तेव्हा ती कारणे चटकन लक्षात येतात; इथे अक्षर वळणदार, इतर चुकांचा अभाव आणि ठरावीक चुकांची नेमाने उपस्थिती - मग या चुकांचा अन्वय कसा लावायचा?

श्री. दिवाकर मोहनी हे एक जाणते शुद्धलेखनतज्ज्ञ आहेत. त्यांचे लेख वाचल्यावर मी त्यांना म्हणतो, "तुम्ही लेखनविषयक नियमांसंबंधी बोलत नसून शुद्धलेखनाच्या तत्त्वज्ञानासंबंधी बोलत आहात; आणि ते फार महत्त्वाचे आहे. पण आता 'मराठी शुद्धलेखनाचे तत्त्वज्ञान' असा ग्रंथ हातावेगळा करा आणि एकदा 'शुद्धलेखनाचे मानसशास्त्र' असा एखादा लेख लिहा." या विषयावर मोहनींनी नव्हे; पण मानसशास्त्र आणि लेखननियम या विषयांत पारंगत असणाऱ्या एखाद्या पंडिताने मात्र लेख अवश्य लिहावा - म्हणजे ऱ्हस्व दृष्टीच्या, दीर्घ दृष्टीच्या, अनुस्वारदोषाच्या अशा अनेक लेखनरुग्णांवर इलाज करणे मराठीच्या शिक्षकाला सोयीचे जाईल.

कवी निरंकुश असतात, असे म्हणतात; पण कै. मर्ढेकरांसारखा कवी 'भिवई' (अनेकवचन 'भुवया'), 'काठिन्य', क्लिन्न (आर्द्र) अशी अचूक रूपे, असे अचूक शब्द वापरतो. उलट, अनेक प्रतिभावंत गद्यलेखक व चोखंदळ मुद्रक याबाबत काटेकोरही नसतात, काटेतोलपणाही दाखवीत नाहीत.

साहित्यसमीक्षेला मानसशास्त्राची जोड देण्याऐवजी बाल-मानसशास्त्र, विकृति-मानसशास्त्र यांच्याप्रमाणे साहित्य-मानसशास्त्र अशी मानसशास्त्राची वेगळी शाखा तयार व्हावी; तशी शुद्धलेखनाचे मानसशास्त्र शोधता शोधता 'लेखनविद्येचे मानसशास्त्र' अशी वेगळी शाखा निर्माण झाली, तर उत्तमच!

■

**'आद्यायनी', जंतरमंतर, अमरावती महामार्ग, नागपूर - ४४० ०१०**

# ‘कानडा विठ्ठलु’ मधील ‘कानडा’

म. अ. मेहेंदळे

*सुधीर रसाळ यांच्या ‘कानडा विठ्ठलु’ (२०:१, हिवाळा २००२) या लेखासंबंधी एक प्रतिक्रिया पाठवत आहे.*

ज्ञानेश्वरांच्या एका अभंगात ‘कानडा हो विठ्ठलु कर्नाटकु’ असे विठ्ठलाविषयी म्हटले आहे. याचा अर्थ ‘कानडी प्रांतातला विठ्ठल’ असा करण्याकडे प्र.न. जोशी यांचा कल आहे. सुधीर रसाळ यांना हा अर्थ योग्य वाटत नाही; कारण अभंगात ‘कर्नाटकु’ असा आणखी एक शब्द असल्याने जोशी यांनी केलेल्या अर्थात द्विरूक्ती होते, ती अनाठायी आहे. रसाळ यांनी घेतलेला हा आक्षेप योग्य आहे. पूर्वीच्या अभ्यासकांनी वरील अभंगातील ‘कानडा’ शब्दाचा ‘दुर्बोध, अनाकलनीय, अगम्य’ असा जो अर्थ केला आहे, तो रसाळ यांना योग्य वाटतो. त्यांचे हे मतही स्वीकारण्यासारखे आहे. परंतु ‘कानडा’ ह्या शब्दाला ‘अनाकलनीय’ हा अर्थ कसा प्राप्त झाला, ह्याविषयीचा रसाळ यांचा खुलासा समाधानकारक वाटत नाही.

रसाळ यांच्या मते ‘कानडा’ शब्दाचा कन्नड भाषा अथवा कन्नड भूप्रदेश यांच्याशी संबंध नाही. संस्कृतात ‘एका डोळ्याचा, तिरळा’ या अर्थी जो ‘काण’ शब्द आहे, त्याच्याशी ‘कानडा’चा संबंध आहे, असे रसाळ मानतात. संस्कृत ‘काण’ > मराठी ‘कान’, याला ‘डा’ प्रत्यय जोडून ‘कानडा’ शब्द सिद्ध झाला असल्याचे ते मानतात.

ही शब्दसिद्धी योग्य नाही. संस्कृत शब्दातल्या स्वरमध्य ‘ण’चे मराठीत ‘न’ असे ध्वनिपरिवर्तन होत नाही. मुळातला स्वरमध्य ‘ण’ मराठीत तसाच राहतो. जसे, मणि, बाण, तण, काणा इत्यादी. उलट मुळातल्या स्वरमध्य ‘न’चा मराठीत ‘ण’ होतो, जसे पानीय - पाणी, आनय् - आणणे, जन-जण, इत्यादी. परंतु संस्कृत संयुक्त वर्ण, ‘स्न’, ‘ष्ण’ ह्यांचे प्राकृतात ‘ण्ह’ असे रूप झाले, तर त्याचे मराठीत ‘न्ह’, जसे प्रस्तव > पण्हव > पान्हा, कृष्ण > कण्ह > कान्हा, असे

रूप होते. तसेच संस्कृत 'र्ण' या संयुक्त वर्णाचे जर प्राकृतात 'ण्ण' असे ध्वनिरूप आढळले, तर तिथेही मराठीत 'न' व्यंजन दिसते. जसे, सुवर्ण > सुवण्ण > सोने, कर्ण > कण्ण > कान इत्यादी. परंतु अशा संयुक्त व्यंजनाखेरीज नुसत्या स्वरमध्य संस्कृत 'ण'चा मराठीत 'न' होत नाही. (पहा : ब्लोख (J. Bloch) यांच्या La Formation de la Langue Marathe चे प्रा. वा. गो. परांजपेकृत मराठी भाषांतर 'मराठी भाषेचा विकास' (१९४१, पृ. १७२-१७५).

शब्दरूपानंतर अर्थाच्या दृष्टीने पाहताही रसाळ यांच्या विवेचनात अर्थाची काहीशी ओढाताण झाल्यासारखी वाटते. त्यांच्या मते 'एका डोळ्याचा, तिरळा' या अर्थी असलेल्या संस्कृत 'काण' शब्दापासून उद्भवलेल्या मराठी 'काना' या शब्दालाही तोच अर्थ. या अर्थी नुसत्या 'काना' शब्दाचा उपयोग मराठीत माहितीत नाही. शब्दकोशात तो दिला नाही. रसाळ यांच्या मते 'काना' मनुष्य जिकडे पाहतो, तिथल्या सर्व गोष्टी त्याच्या दृष्टीच्या टप्प्यात येत नसल्याने त्या त्याला 'अनाकलनीय' राहतात. 'काना' माणसाचे वागणे-बोलणे इतरांस दुर्बोध, अनाकलनीय वाटते. तेव्हा 'तिरळा' हा मुख्यार्थ असलेल्या 'काना' ह्या विशेषणाला 'अनाकलनीय, संदिग्ध, दुर्बोध' ह्या लक्षणेने प्राप्त झालेल्या अर्थच्छटा आहेत (पृ. ५).

'कानडा' शब्दाचा रसाळ यांचा वरील खुलासा समाधान करणारा नसल्याने 'दुर्बोध, अनाकलनीय' ह्या अर्थाचा दुसरा खुलासा सुचवावासा वाटतो.

सर्वसामान्य इंग्रजी माणसाला ग्रीक भाषा अवगत नसल्याने 'अनाकलनीय' (Unintelligible, beyond one's comprehension) हा अर्थ व्यक्त करण्यासाठी 'ग्रीक' म्हणजे 'ग्रीक भाषा' ह्या शब्दाचा उपयोग इंग्रजीत होतो. 'It is Greek to me' म्हणजे 'मला हे समजण्यापलीकडचे आहे, अनाकलनीय आहे'. मराठी माणसाला हा सामान्यतः कानडी भाषा येत नसल्याने ज्ञानेश्वरांच्या काळी 'अनाकलनीय' हा अर्थ व्यक्त करण्यासाठी 'कानडी' ह्या शब्दाचा उपयोग होत असणे शक्य आहे. 'मला हे कानडी आहे' म्हणजे 'मला हे काही कळत नाही'. मराठीने 'कानडी' म्हणजे 'कानडी भाषा' ह्या नामापासून 'कानडा' हे विशेषण मिळवले. त्यामुळे आवश्यकतेनुसार 'कानडा, कानडी, कानडे' अशी तिन्ही रूपे मिळवण्याची सोय झाली. हा खुलासा स्वीकारला असता विठ्ठलाला 'कानडा' म्हणजे 'अनाकलनीय, दुर्बोध' असे म्हणताना लगेच 'कर्नाटकु' का म्हटले आहे, तेही

लक्षात येते.

'ग्रीक' शब्दाचा 'unintelligible speech or language' ह्या अर्थी प्रथम उपयोग इ.स. १६०० साली झाल्याचे इंग्रजी कोशात सांगितले आहे (J.T.H. Murrary संपादित A New English Dictionary on Historical Principles, Oxford, 1901). 'कानडी' म्हणजे 'कानडी भाषा' यापासून मिळवलेल्या 'कानडा' या विशेषणाचा 'अनाकलनीय' ह्या अर्थी उपयोग मराठीत इंग्रजीच्या पूर्वी तीनशे वर्षे झालेला दिसतो.

तेव्हा 'कानडा' या शब्दाचा संबंध संस्कृत 'काण'शी नसून कर्नाटक भूप्रदेशातल्या कानडी भाषेशीच आहे.

रसाळ यांनी त्यांच्या विवेचनात 'कानोडा, कानोडं' या विशेषणांचा 'तिरपा, एका बाजूस कललेला' ह्या अर्थाचा, तसेच 'कानाकोपरा', 'कानाडोळा' या शब्दांचा 'दृष्टीच्या टप्प्यात न येणारी गोष्ट' या अर्थाचा उल्लेख केला आहे. त्यांत आढळणारा 'काना' या शब्दाची सांगडही ते संस्कृत 'काण'शी घालू पाहतात. संस्कृत 'काण'पासून 'काना' हे ध्वनिरूप मिळविणे कठीण आहे, हे वर सांगितलेच आहे. अर्थदृष्ट्या वरील शब्दांत आढळणारा 'कान' हा भाग संस्कृत 'कर्ण' शब्दापासून मराठीत आलेल्या 'कान' शब्दाशी संबद्ध आहे. एखाद्या वस्तूकडे सरळ डोळ्यांनी न पाहता मान फिरविली की त्या वस्तूकडे कानाने 'पाहिल्या'सारखे होते आणि मग ती वस्तू दृष्टीच्या टप्प्यात येईनाशी होते. 'कानाआड घालणे' ह्या वाक्प्रयोगाने हेच सूचित केले आहे. वस्तूकडे 'कानाडोळा' करणे म्हणजे 'कानाचा डोळ्यासारखा उपयोग करू पाहणे, दुर्लक्ष करणे.'[१] जेवायच्या ताटाला टेकण लावून ते एकीकडे कलते केले म्हणजे जणू ताटाला एका 'कानावर' फिरवल्यासारखे होते (ताट कानोडे केले). 'कानवडे ठाकणे' ह्या शब्दप्रयोगातील 'कानवडे' शब्दाचा खुलासाही 'कान' शब्दाच्या साहाय्याने करता येतो. 'कानवडे ठाकणे' म्हणजे वस्तूकडे 'कान करून उभे राहणे', 'कानोडा', 'कानोडं' ही 'कानवडे'ची संक्षिप्त रूपे असल्यासारखी वाटतात.

---

**संदर्भ :**

१. 'कानाडोळा' ह्या ऐवजी 'काणाडोळा' असाही प्रयोग क्वचित आढळतो. तिथे तेवढा 'काणा'चा संबंध संस्कृत 'काण'शी आहे असे म्हणता येते.

■

# ‘मृच्छकटिक’ नाटकातील ‘कल्यवर्त’ आणि ‘अर्थकल्यवर्त’

म. अ. मेहेंदळे

डॉ. धडफळे यांनी ‘भाषा आणि जीवन’च्या वर्ष १६ आणि वर्ष १८ या दोन खंडांच्या अनुक्रमे चौथ्या आणि पहिल्या अंकात ‘साहित्य’ आणि ‘कला’ या दोन शब्दांविषयी त्यांची मते मांडली आहेत. त्यावरील माझी प्रतिक्रिया ‘भाषा आणि जीवन’च्या वर्ष २०च्या पहिल्या अंकात प्रसिद्ध झाली आहे. त्यावरील डॉ. धडफळे यांची संक्षिप्त प्रतिक्रिया ‘भाषा आणि जीवन’च्या वर्ष २० च्या दुसऱ्या अंकात प्रसिद्ध झाली आहे. वाचकांसमोर दोन्ही मते आहेत. ग्राह्याग्राह्य ठरविण्यास ते समर्थ आहेत. त्या प्रतिक्रियेत डॉ. धडफळे यांनी ‘अर्थकल्यवर्त’चा पहिल्या अंकातील उपयोगाविषयी मी जो अर्थ दिला आहे (खरे तर हा अर्थ माझा नवा नव्हे; आधीच्या अभ्यासकांनी केलेला अर्थ मी स्वीकारला आहे.), तो देताना मला अभिप्रेत असलेल्या अर्थाविषयी गैरसमज करून घेतला आहे, तेवढ्यापुरता आणि ह्या शब्दाविषयी पुन्हा एखादा खुलासा करतो. डॉ. धडफळे यांनी मूळ लेखात ‘अर्थकल्यवर्त’ शब्दाचा अर्थ ‘आर्थिक सुस्थिती’ असा केला आहे. तो योग्य नसून त्या शब्दाचा ‘अर्थरूपी नगण्य वस्तू, क्षुल्लक बाब’ असा जो पूर्वीच्या अभ्यासकांनी अर्थ केला आहे, तोच योग्य असल्याचे मी म्हटले. पहिल्या अंकातल्या संदर्भात जो अर्थ योग्य, तोच मृच्छकटिकातील त्या शब्दाच्या इतर अंकातही जुळतो. डॉ. धडफळे आता दुसऱ्या लेखात म्हणतात की, मृच्छकटिकातील ‘अर्थकल्यवर्त’ या शब्दाच्या उपयोगाचे दोन भाग करायला हवेत. पहिल्या भागातील एक वाक्य (खरे तर दोन वाक्ये) आणि दुसऱ्या भागातील इतर वाक्ये असे ते दोन भाग. डॉ. धडफळे यांना मृच्छकटिकाच्या चौथ्या अंकात येणाऱ्या ‘स्त्रीकल्यवर्त’ (एकदा) आणि नवव्या आणि दहाव्या अंकात येणाऱ्या ‘अर्थकल्यवर्त’ (सहा वेळा) या शब्दप्रयोगांतील ‘कल्यवर्त’चा ‘क्षुल्लक गोष्ट, फारसे महत्त्व न देण्याजोगी बाब’ हा अर्थ पटतो; परंतु पहिल्या अंकात मात्र ‘कल्यवर्त’चा ‘सुस्थिती’ हाच अर्थ स्वीकार्य वाटतो.[१] ‘कल्यवर्त’ या शब्दातील ‘कल्य’ > पाली ‘कल्ल’ याचा

प्रशस्तीसूचक अर्थ 'मिलिन्दप्रश्न' या ग्रंथात असल्याचे डॉ. धडफळे यांनी नमूद केले आहे. संस्कृतातही 'कल्य' शब्दाचे 'निरामय, दक्ष, सज्ज' असे अर्थ संस्कृत कोशात दिले आहेत. तसेच कल्यम् (अव्यय) याचे 'पहाटे, उषःकाली' असेही अर्थ कोशात आहेत. 'कल्यम्'च्या जोडीने संस्कृतात 'काल्यम्' असेही रूप 'पहाटे' या अर्थी आढळते. मायर होफर यांच्या कोशानुसार हे दोन काहीसे निरनिराळे अर्थ असलेला 'काल्य' अथवा 'कल्य' हे शब्द संस्कृत 'काल'पासून साधलेले असावेत. कालांतराने शब्दांना उलटसुलट अर्थ प्राप्त होतात, हे डॉ. धडफळे वाचकांच्या निदर्शनास आणतात. हे सर्वश्रुत आहे. पण 'अर्थकल्यवर्त' या शब्दाचा 'आर्थिक सुस्थिती' आणि 'अर्थरूपी क्षुल्लक बाब' अशा भिन्न अर्थी शूद्रकाने एकाच ग्रंथात आणि अर्थांची इतकी व्यवस्थित विभागणी करून (पहिला अंक विरुद्ध चौथा, नववा व दहावा अंक) केला असेल, हे शक्य वाटत नाही आणि तसे मानण्याची आवश्यकता दिसत नाही.

आर्थिक सुस्थिती चारुदत्तासारख्या गुणी माणसाला सोडून गेली असल्यामुळे विदूषकाचा अर्थावर, धनावर राग आहे. तो राग अर्थाला म्हणजे संपत्तीला 'दास्याःपुत्राः' असे म्हणून त्याने व्यक्त केला आहे. पण तेवढ्याने समाधान न झाल्यामुळे तो धनाला 'कल्यवर्त' म्हणजे 'एक क्षुल्लक, फारसे महत्त्व नसलेली बाब' असेही म्हणतो. वास्तविक विदूषकाला जे म्हणायचे आहे, ते नुसते 'अेते अर्थाः यत्र यत्र न खाद्यन्ते' असे म्हणूनही सांगता आले असते. परंतु धनावरील रागामुळे तो 'दास्याःपुत्राः' आणि 'अर्थकाल्यवर्ताः' असे म्हणून हिणवतो. मृच्छकटिकातील वाक्य आहे 'अेते अर्थकल्यवर्ताः यत्र यत्र न खाद्यन्ते तत्र तत्र गच्छन्ति' याचा अर्थ 'हे क्षुद्र मामुली धन जेथे खाल्ले जात नाही, तेथे जाते' असा मी करतो असे म्हणून डॉ. धडफळे पुढे म्हणतात : "हा अर्थ डॉ. मेहेंदळे यांना कदाचित रुचेलही; मला पटत नाही. 'जिथे खाल्ले जात नाही, तेथे रगड संपत्ती जाते' असेच मैत्रेयाला म्हणायचे असणार." डॉ. धडफळे म्हणतात ते बरोबर आहे, मलाही तेच म्हणायचे आहे. फरक एवढाच की, मी केलेल्या अर्थातल्या 'क्षुद्र, मामुली धन' याचा डॉ. धडफळे मानतात तसा 'संख्येने अल्प' असा अर्थ मला अभिप्रेत नाही. धनाची संख्या लहान, मोठी कितीही असो, गुणवत्तेच्या दृष्टीने ते क्षुल्लक, नगण्य असते, असे विदूषकाला म्हणायचे आहे. असे गुणांच्या दृष्टीने हीन असलेले धन (अर्थकल्यवर्त) - मग ते थोडे, फार कितीही असो, इथे विदूषकाला 'फार' हा अर्थच अभिप्रेत आहे - ते जिथे खाल्ले जात नाही, म्हणजे

त्याचा जिथे नीट उपयोग होत नाही, तिथे जाते; त्याचा दानादिकासारखा सदुपयोग करणाऱ्या चारुदत्ताजवळ ते राहत नाही.

'अर्थकल्यवर्त'चा 'संख्येला किरकोळ' असा निखालस चुकीचा अर्थ मला अभिप्रेत आहे, असे मानून तो मला 'रुचेलही' असे म्हणताना डॉ. धडफळे यांनी 'कदाचित' असे म्हणून माझ्या मताविषयी थोडी शंका व्यक्त केली आहे, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

श्रीमती शांताबाई शेळके यांच्या निधनानंतर 'रविवार सकाळ'च्या ९ जून २००२ च्या अंकातल्या 'सप्तरंग' पुरवणीत 'कविता कशा सुचल्या?' हा त्यांचा पूर्वी प्रकाशित न झालेला लेख प्रथमच प्रसिद्ध झाला आहे. त्यात त्यांनी पृ. ४ वर सॉमरसेट मॉम यांच्या Moon and Six pence या कादंबरीचा उल्लेख केला आहे. मी ही कादंबरी वाचली नाही. पण श्रीमती शेळके यांनी जे म्हटले आहे की, सॉमरसेट मॉमने "सिक्स पेन्सच्या नाण्याची प्रतिमा ऐहिक वैभव, सुखसंपत्ती या अर्थाने वापरली आहे," यावरून संपत्तीला सिक्स पेन्स म्हणून त्याविषयी जर मॉमला क्षुद्रभाव दाखवायचा असला, तर विदूषकालाही धनाला 'कल्यवर्त' म्हणून तोच भाव व्यक्त करायचा आहे.

■

**संदर्भ :** १. लिहिण्याच्या ओघात अनवधानाने 'अर्थकल्यवर्त'चा 'न्याहरी' हा अर्थ असल्याचे डॉ. धडफळे यांनी म्हटले आहे. वास्तविक 'न्याहरी' हा अर्थ 'कल्यवर्त'चा आहे; 'अर्थकल्यवर्त'चा नव्हे.

**बी-४, प्रबोधन सोसायटी, एरंडवणे, पुणे - ४११ ००४.**

**साद आणि प्रतिसाद**

# 'कर्नाटकु' नव्हे; तर 'कर-नाटकु'

**नारायण शंकर आपटे**

(१)

'भाषा आणि जीवन' २०.१ मधील 'कानडा विठ्ठलु' लेखात सुधीर रसाळांनी ज्ञानेश्वरांच्या 'पांडुरंगकांती' (की 'कांति'? ज्ञानेश्वरांनी पण ऱ्हस्व इकाराचा दीर्घ इकार केला होता का?) अभंगाचे उदाहरण दिले आहे.

मला वाटते की, खटकणाऱ्या 'कर्नाटकु'ऐवजी ज्ञानेश्वरांना तेथे 'कर-नाटकु' हा शब्द अभिप्रेत असावा. कारण विठ्ठल हा नाटक लिहिणारा, ते घडवणारा आणि त्यातील मुख्य भूमिका अभिनीत करणारा नाटकेश्वर आणि नटेश्वरपण आहे.

मी सुचविलेल्या या 'कर-नाटकु' शब्दाचा शोध घेण्यात यावा.

(२)

याच अंकामधील 'साद आणि प्रतिसाद' लेखात परिच्छेद २.१ एकविसावे शतक, तिसरे सहस्रकमध्ये म. अ. मेहेंदळे यांनी लिहिले आहे की "तेव्हा दैनिक सकाळमध्ये एका जाणकार पत्रलेखकाने नवे शतक १.१.२००० रोजी सुरू होते असे का म्हणतात, त्याचा खुलासा केला होता. पत्रलेखकाचे नाव आता आठवत नाही..." ते पत्र मीच लिहिले असल्याचे आठवते. दैनिक सकाळ घेणे मी थांबवल्याने त्या पत्राचे कात्रण माझ्याजवळ नाही.

(३)

**संख्यावाचक व्यावहारिक नामे** - शून्य, एक ते नऊ, नंतर दहा, वीस, तीस ... ते नव्वद, एकशे, दोनशे, तीनशे ते हजार ही व अशी प्रचलित संख्यावाचक व्यावहारिक नामे योग्य आहेत.

पण, अकरा ते एकोणीस, एकवीस ते एकोणतीस ...एक्याण्णव ते नव्याण्णव ही अशी मधली नामे संख्या उलटी वाचणारी असल्याने ती चुकीची आहेत. वीस उणे एक - एकोणीस, तीस उणे एक - एकोणतीस यांसारख्या चुकीच्या नामांनी तर कहर केला आहे. त्या पूर्ण संख्येला पोहोचण्यापूर्वीच त्यातून एक उणे करणे निखालस चुकीचे आहे.

म्हणून संख्या स्थानमूल्यानुसार सुलट्या सांगणाऱ्या दहाएक ते दहानऊ, वीसएक ते वीसनऊ .. नव्वदएक ते नव्वदनऊ अशा सोप्या, सुटसुटीत संख्यावाचक व्यावहारिक नामांचा वापर सुरू केला पाहिजे.

■

**आपटे निवास, लोटे परशुराम, खेड-रत्नागिरी - ४१५७२२**







## सूचना फलक

- 'भाषा आणि जीवन' २००२ पासून इंटरनेटवर उपलब्ध असतो. तो इंटरनेटवर वाचण्यासाठीच्या सूचना पुढीलप्रमाणे -
- "जे जे मराठी" या साईटवरील 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' पहाण्यासाठी : इंटरनेटला कनेक्ट झाल्यानंतर आपल्या कॉम्प्युटरच्या डेस्कटॉप वरील इंटरनेट एक्स्पोअररवर क्लिक करावे. पेजच्या ॲड्रेस समोर www.jjmarathi.com लिहून एंटर-की दाबावी. आता आपल्याला साईटचे होम-पेज दिसेल. येथील 'नियतकालिक विभाग' वर क्लिक करावे.
- आता आपल्याला नियतकालिक विभागातील पहिले पान दिसेल.

  "मराठी अभ्यास परिषद पत्रिका" वर क्लिक केल्यावर आपण या त्रैमासिकाच्या विभागात जाता. तिथे आपणास या त्रैमासिकाविषयी माहिती मिळू शकेल. तसेच साईटवर उपलब्ध असलेल्या अंकांची नावे दिसतील. अंकाच्या नावावर क्लिक केल्यावर आपण तो अंक वाचू शकता.

  उदा. :- भाषा आणि जीवन वर्ष २०, अंक १, हिवाळा २००२ वर क्लिक केल्यावर आपल्याला त्या विशिष्ट वेब-अंकाचे पहिले पान दिसेल.

  या पानावर उजवीकडे संस्थेचे बोधचिन्ह दिसते. तसेच आपल्याला अंकाचे मुखपृष्ठ आणि अंकासंबंधीची इतर माहिती वाचायला मिळेल. बोधचिन्हाच्या शेजारी अनुक्रमणिका असेल. स्क्रोल करून आपण ती वाचू शकता. विशिष्ट लेखावर क्लिक केल्यास सदर लेख P.D.F.form मध्ये असल्यामुळे प्रथम Adobe Acrobat open screen दिसेल व त्यानंतर आपण तो लेख वाचू शकता. या लेखांच्या फाईल्स मोठ्या असल्यामुळे त्या आपल्या कॉम्प्युटरवर डाऊन लोड होण्यास थोडा जास्त वेळ लागू शकतो.
- साईट व्यवस्थित पहाण्यासाठी खालील गोष्टींची व्यवस्था असणे आवश्यक आहे.

  Computer System : Pentium II 366 MHz
  RAM : 64 MB Minimum 128 MB Recommended.
  Set Dispay Resolution : 800 by 600 pixels
  Acrobat Reader 3.0 or higher version should be loaded on PC
  1GB HDD space should be free to accomodate Acrobat Reader and other Temp files.
  At times you may see "cut marathi words" on screne. This can be

imporoved by changing the text size on browser pages. To do this, on page, click on View option; then click on Text size sub-option and click on the required size.

वरील सूचना विचारात घेऊन पुढील सुधारणा व शंकांसाठी साइटच्या 'होम पेजवरील' 'साहाय्य' ही लिंक क्लिक करा.

आपण हा अंक इंटरनेटवर वाचा आणि मित्रांना, दूरस्थांना आणि इतर इंटरनेट वाचकांनाही सांगा.



## सूचना फलक

वर्ष - २० : ३ / पावसाळा २००२ या अंकातील काही चुकांबद्दल दिलगिरी व्यक्त करीत आहोत. तपशील पुढीलप्रमाणे -

| पृष्ठ | ओळ | शब्द असा आहे | असा वाचावा |
|---|---|---|---|
| २६ | ६ | दत्यु | दद्यु |
| २७ | ९ | यस्मादाम | यस्माद्यमयसे |
| २७ | २१ | The | "The |
| २८ | ४ | यंम | यमं |
| २८ | ९ | यंमम् | यमंम् |
| २८ | ११ | 'यंम' | 'यमं' |
| २८ | १३ | यमं | यम |
| २८ | १८ | पड्वीश | पड्बीश |
| २८ | १९ | शास्त्राचा | शस्त्राचा |
| २८ | २९ | यमं | यम |
| २९ | ६ | वीर्यमयुवत् | वीर्यमयुवत |
| २९ | ७ | अयुवत् | अयुवत |
| २९ | २७ | आवसानं | अवसानं |
| २९ | ३० | यम या | यम् या |
| ३४ | ९ | अतिसाधव | अतिसावध |
| ५१ | ५ | एकांगिकापणा | एकांगिपणा |
| ५४ | ११ आणि १६ | पुलिंग | पुंलिंग |

# मूक-बधिरांना दिलासा

विजया देव

भारतभर विखुरलेल्या मूक-बधिरांची सर्वांना समान अशी एकच सांकेतिक भाषा नाही. चिह्नांमध्ये एकवाक्यता नसल्यामुळे गेली पन्नास वर्षे त्यांना संज्ञापनातल्या अडथळ्यांना तोंड द्यावं लागत आहे. आता मात्र सर्व भारतीय मूक-बधिर एका राष्ट्रीय सांकेतिक भाषेचे धनी होतील, अशी लक्षणं आहेत. तसं झाल्यास त्यांचा 'वाचाळ' जगाशी होणारा व्यवहार थोडा सुकर होईल.

सांकेतिक भाषा अनेक राज्यांमध्ये प्रचलित असली, तरी राज्या-राज्यानुसार या भाषेत फरक पडतो. कारण मूक-बधिरांसाठी असलेल्या संस्था आणि राज्ये यांच्यामध्ये आपापसांत समन्वय नाही. शिवाय या चिह्नांना प्रांतीय वैशिष्ट्यांचीही जोड मिळते; त्यामुळे आपल्या प्रांताबाहेर पडल्यावर त्या व्यक्तींना संज्ञापनात अडथळे जाणवू लागतात. संज्ञापनातील हे अडसर दूर करण्यासाठी एका प्रकल्पाची मुहूर्तमेढ रोवली गेलेली आहे. श्रीरामकृष्ण मिशन विद्यालय, कोईमतूर या संस्थेने ख्रिस्तोफर ब्लेंडन मिशनच्या सहकार्यानं 'भारतीय सांकेतिक भाषा विकास प्रकल्प' आखला आहे.

प्रारंभिक तयारी म्हणून या प्रकल्पाने आधी शब्दकोशाचं संकलन केलं. त्यात सोळाशे शब्द आणि अडीच हजाराच्या वर चिह्नं आहेत. या संपूर्ण प्रकल्पाचे समन्वयक श्री.व्ही. गोपालकृष्णन् आहेत. ते म्हणतात, "आपली स्वतःची भाषा निर्माण करण्याची मूक-बधिरांची धडपड देशाला स्वातंत्र्य मिळाल्यापासून चालू आहे. इतर देशांमध्ये एकच समान भाषा मूक-बधिरांना असल्याला साठ वर्षे होऊन गेली. आपल्याकडे मात्र राज्याची सीमा ओलांडली, की मूक-बधिरांच्या अडचणींना सुरुवात होते. साधा कपभर चहा मागावयाचा, तरी त्याच्या खुणा राज्यानुसार बदलतात. संवाद साधण्यातील या अडचणींपायी त्या व्यक्तीला वैफल्य येतं."

या शब्दकोशाचे रचनाकार श्री. गोपालकृष्णन् यांनी कोशाचे संकलन

करण्यापूर्वी देशातील बेचाळीस शहरांमध्ये विखुरलेल्या संस्थांना आणि मूक-बधिरांच्या शाळांना भेटी दिल्या. मूक-बधिर व्यक्ती करपल्लवीखेरीज मौखिकतेचाही आश्रय घेत असते. (मूक-बधिरांशी बोलताना इतरांनी करपल्लवीव्यतिरिक्त शब्दांचा उच्चारही करणे. म्हणजे मुखाच्या, ओठांच्या स्थितीवरून मूक-बधिरांना भाषेचा अंदाज घेत अर्थ ताडता येतो.) पण ज्या शब्दांच्या उच्चारांत ओठांच्या हालचाली सारख्याच दिसतात, तिथे त्यांची गफलत व्हायची शक्यता असते; उदा., 'पूल', 'फूल' किंवा 'काच', 'खाच'. म्हणून चिह्नांमध्ये सार्वत्रिकता असणं महत्त्वाचं. या सांकेतिक भाषांचं संकलन झालं, तरी त्याचा प्रसार देशातल्या सर्व संस्थांमधून होणं आवश्यक आहे. संवादातल्या या फटी बुजवायला पुनर्वसन संस्थेनं परिचय सत्रांचं आयोजन करायला सुरुवात केलेली आहे. (रिहॅबिलिटेशन कौन्सिल ऑफ इंडिया).

श्रवणक्षमतेची कमतरता असलेल्या व्यक्तींचं शिक्षण आणि पुनर्वसन यांच्याशी संबंधित असलेल्या अध्यापकांना आणि व्यावसायिकांना अधिक सजग करणं, हे या उपक्रमाचं उद्दिष्ट आहे.

■

**('इकनॉमिक टाइम्स्' मधील वृत्ताधारे)**

**९, 'प्रिया', ९, वरळी सी-फेस, मुंबई ४०० ०२५.**

## कोशवाङ्मयात पुणेकर महत्त्वाचे!

पंच्याहत्तरी ओलांडलेल्या शिकागो विद्यापीठाच्या ज्येष्ठ प्राध्यापिका, जातिसंस्थेच्या अभ्यासिका डॉ. मॉरिन पॅटरसन यांचे नाव घेतले की त्यांच्या कार्याबद्दल एक प्रकारचा आदर ज्ञानाच्या क्षेत्रात व्यक्त केला जातो. भारतीय विद्यांच्या ग्रंथमालेची समग्रसूची करण्याची कल्पना त्यांचीच. ......मादाम पॅटरसन शिकागो विद्यापीठाच्या ॲसोशिएट प्रोफेसरपदी बराच काळ होत्या. नंतर साऊथ एशियन कलेक्शनच्या मुख्य सूचिकार म्हणून त्यांची नियुक्ती झाली. त्यातून शिकागो विद्यापीठ ग्रंथालयातून त्यांनी 'पुस्तकमाले'ची बृहत्सूची सुरू केली. महाराष्ट्रात 'दातेसूची' चे कार्य खूप महत्त्वाचे आहे असे त्या मानतात. कोशवाङ्मयाच्या क्षेत्रात मराठी विद्वानांचे योगदान खूपच महत्त्वाचे आहे असे त्या मानतात. त्यातही भारतीय संस्कृती कोश, चरित्र कोश यांचे कर्ते पुण्यातील आहेत, म्हणून पुणेकर महत्त्वाचे!

■

**('भारतीय विद्येचे विदेशी विद्वान' वा. ल. मंजूळ, उत्कर्ष प्रकाशन, पुणे २००१ पृ.१७)**

# भाषा आणि जीवन : वर्ष २०, २००२ ची लेखन सूची

## लेखकसूची

**लेख सूची**

■

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे राहतील.

| | | | |
|---|---|---|---|
| वार्षिक वर्गणी - संस्थेला | रु. १२५ फक्त | पंचवार्षिक | रु. ५५० फक्त |
| व्यक्तीला | रु. १०० फक्त | पंचवार्षिक वर्गणी | रु. ४५० फक्त |

**२. आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु.४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

**३. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-

**५. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**६. जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

R.N.I. नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

BOOK-POST

इंटरनेटवरील 'भाषा आणि जीवन' वाचण्यासाठी सूचना फलक पृ. ५६ पाहा.



प्रति



प्रेषक
मराठी अभ्यास परिषद
३, अन्नपूर्णा, १२५१, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर,
पुणे ४११ ००२. (दू. क्र. ४४८६०१५)

अनुक्रमणिका





